


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष ३७ । अंक ५ । फेब्रुवारी १९८४

**शेख शब्बीर :**

राजर्षी शाहूमहाराजांचे शैक्षणिक धोरण व कार्य

**बाळ गांगल :**

शरद् पाटीलकृत 'दासशूद्रांची गुलामगिरी' : एक परीक्षण

**अशोक नारायण ठाकूर :**

नोबेल पारितोषिके : १९८३

**व्यंकटेश आत्राम :**

गोंड परधानांची लग्नगीते

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ३७ । अंक ५ । फेब्रुवारी १९८४
किंमत ४ रुपये । वार्षिक वर्गणी ३० रुपये

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक सहमत असतीलच, असे नाही.

---

अध्यक्ष व विश्वस्त
तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

संपादक
मे. पुं. रेगे

---

संपादकीय पत्रव्यवहार :
मे. पुं. रेगे,
संपादक, ‘नवभारत’ मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

---

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, ‘नवभारत’ मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
( जि. सातारा )

---

या नियतकालिकाच्या प्रकाशनार्थ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले आहे.








# नवभारत

फेब्रुवारी १९८४

अनुक्रम



## लेखक-परिचय

■ **शेख शब्बीर :** अधिव्याख्याते आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक, क्वार्टर क्र. २४, विदर्भ हाउसिंग कॉलनी, सिव्हिल लाइन्स, वर्धा. ■ **बाळ गांगल :** मुंबई विद्यापीठाच्या संस्कृत विभागात प्रपाठक; १४ बी, सायन कामगार हाउसिंग सोसायटी, सायन, मुंबई–४०० ०२२. ■ **अशोक नारायण ठाकूर :** मराठी विश्वकोशात भूविज्ञान, धातुविज्ञान, वातावरणविज्ञान इ. विषयांचे संपादक, वाई–४१२ ८०३. ■ **व्यंकटेश आत्राम :** सिनेटर, नागपूर विद्यापीठ, संस्थापकसचिव, आदिवासी संशोधन समिती, अमरावती; संघटक, आदिवासी सेवा समिती, कचनूर (जि. वर्धा). ■ **अशोक सदाशिव भट :** विधिज्ञ आणि सामाजिक कार्यकर्ते, मधली आळी, वाई– ४१२८०३ (जि. सातारा). ■ **ना. बा. मराठे :** निवृत्त संपादक, इंडियन नॅशनल बिब्लिऑग्राफी, सेंट्रल रेफरन्स लायब्ररी, बेल्व्हेदेर, कलकत्ता– २७; धर्मकोशाचे विशेष कार्यकर्ते, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई– ४१२ ८०३.



**चुकीची दुरुस्ती** – या अंकातील पृष्ठ क्र. ५८, ५९ व ६० याऐवजी कृपया अनुक्रमे पृ. ५६, ५७ व ५८ असे वाचावे. –संपादक

संपादकीय

## सर्वधर्मसमभाव

'सर्वधर्मसमभाव' ह्या शब्दाचा नेमका अर्थ काय असेल ? विशेषतः भारतासारख्या बहुधर्मी समाजाच्या संदर्भात ह्या शब्दाने कोणता आशय व्यक्त होतो ? समजा, एखाद्या भारतीय मुसलमानाने सर्वधर्मसमभावाची वृत्ती धारण केली तर तो स्वतःच्या धर्माकडे आणि हिंदू, ख्रिस्ती इ. इतर भारतीय धर्मांकडे कोणत्या दृष्टीने पाहील ?

भारतीय मुसलमानांच्या दृष्टीतून सर्वधर्मसमभावाचा आशय निश्चित करण्याच्या प्रयत्नाला विशेष महत्त्व आहे. एक तर भारतीय मुसलमान ही भारतातील सर्वांत मोठी धार्मिक अल्पसंख्य जमात आहे. पण त्याहून अधिक महत्त्वाची गोष्ट अशी, की ह्या जमातीविषयी फार जपून, सावधपणे, हळुवारपणे बोलण्याची प्रथा पडली आहे. ह्या प्रथेचा आदर करायचा तर किती हळुवारपणे बोलणं आवश्यक असते ह्याचा अंदाज न आल्यामुळे अनेकजण मुसलमानांविषयी बोलणेच टाळतात. किंवा केवळ औपचारिकपणे बोलतात. मुसलमानांच्या धार्मिक भावना अतिशय नाजूक, हळव्या असतात; इस्लामविषयी योग्य तो आदर बाळगूनही जर त्याच्याकडे चिकित्सक दृष्टीने पाहण्याचा प्रयत्न केला तर प्रकरण लगेच घर्दळीवर येण्याचा संभव असतो; निषेध, मोर्चे इ. प्रकार सुरू होतात; जातीय वातावरण तंग बनण्याची भीती निर्माण होते अशी काहीतरी समजूत ह्या सावधपणामागे असते. ही समजूत गैर आहे एवढेच नव्हे, तर ती भारतीय मुसलमानांना अन्याय करणारी आणि त्यांचा उपमर्द करणारी आहे. सर्वसाधारण भारतीय मुसलमान स्वतःच्या धार्मिक परंपरेकडे प्रगल्भपणे, समंजसपणे पाहू शकत नाही असे तिच्यात अभिप्रेत आहे आणि हे मुसलमानांना अपमानकारक आहे. इतर कोणत्याही धर्माच्या अनुयायांइतकेच मुसलमानही विवेकशील असतात, ते स्वतःच्या धर्माकडे चिकित्सक दृष्टीने पाहत असतात असेच मानले पाहिजे आणि असा आपला अनुभवही आहे. आता जसे हिंदूंमध्ये उघड आणि छुपे जातीयवादी असतात तसेच मुसलमानांमध्येही असतात आणि ही मंडळी जातीय भावना भडकविण्यासाठी निमित्त कधी सापडेल म्हणून टपून बसलेली असतात. त्यांची पर्वा करण्याचे कारण नाही आणि त्यांचे प्रमाण मुसलमानांमध्ये अधिक आहे, असे मानायलाही काही आधार नाही. इतर भारतीय धर्मांविषयी चिकित्सकपणे बोलत असताना इस्लामविषयी बोलणे टाळण्यात इस्लामचा गौरव नाही. उलट इस्लामचे अनुयायी अंधश्रद्ध, अप्रगल्भ असतात असे त्यात अभिप्रेत आहे. आणि हे सर्वधर्मसमभावाशी मूलतः विसंगत आहे.

भारतीय संदर्भात सर्वधर्मसमभावाचा विचार करताना भारतीय राज्यघटना आणि तिला आधारभूत असलेली मूल्ये ध्यानात घेणे आवश्यक आहे. भारतीय राज्यघटना म्हणजे केवळ भारतीय कायद्याचा भाग नव्हे. कोणत्या स्वरूपाचा समाज भारतात निर्माण करायचा आहे ह्याविषयीची राष्ट्रीय सहमती ( कॉन्सेन्सस ) राज्यघटनेतून व्यक्त होते आणि राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यातून आकाराला आलेली अशी ही सहमती आहे. व्यक्तीची प्रतिष्ठा, तिची स्वायत्तता, सर्व व्यक्तींची मूलभूत समानता आणि ह्या समानतेशी सुसंगत असलेला सामाजिक न्याय ह्या तत्त्वांवर आधारलेला समाज भारतात विकसित करण्याची राज्यघटनेची प्रतिज्ञा आहे. ह्या तत्त्वांशी विसंगत असे काहीही जर इस्लाममध्ये असले, इस्लामच्या धार्मिक सिद्धांतांमध्ये किंवा सामाजिक परंपरेमध्ये असले तर ते तात्काल वर्ज्य आणि रद्द ठरते. मग प्रत्यक्ष पवित्र कुराणाचा आधार त्याला असला तरी त्यामुळे

काही फरक पडत नाही. ज्याप्रमाणे अस्पृश्यतेच्या चालीला हिंदू श्रुतिस्मृतींचा आधार असला तरी राज्यघटनेच्या मूल्यांशी ती विसंगत असल्यामुळे ती आपोआप रद्द ठरते, त्याप्रमाणे मुसलमान स्त्रियांना विषम वागणूक देणारे इस्लामचे कायदेही आपोआप रद्द ठरतात. त्याचप्रमाणे मुसलमान आणि मुसलमानेतर यांना विषम वागणूक देणारे इस्लामी कायदे रद्द ठरतात. भारतीय नागरिक असलेले सर्वधर्मसमभावी मुसलमान ही गोष्ट अर्थात आनंदाने स्वीकारतात.

राज्यघटनेने सर्व भारतीयांचा समान नागरी दर्जा आणि समान नागरिकत्व प्रस्थापित केले आहे. शांतता व सुव्यवस्था राखण्यासाठी आणि जनतेचे कल्याण साधण्यासाठी व्यक्तींच्या मूलभूत हक्कांशी सुसंगत ठरतील असे कायदे करण्याचा अधिकार तिने संसदेला आणि विधानसभांना दिला आहे. हे कायदे धर्मनिरपेक्ष असतात. कारण नागरिकांमध्ये भेद करण्यासाठी धर्म हा आधार होऊ शकत नाही. आता एखादा हिंदू जर असे म्हणाला, की मी जसा भारतीय नागरिक आहे तसा हिंदूही आहे आणि हिंदू म्हणून माझ्या जीवनाचे नियमन, त्याच्या शेवटच्या तपशीला-पर्यंत, श्रुतिस्मृतींकडून होते, त्याच्यात ढवळाढवळ करण्याचा संसदेला अधिकार नाही तर ते चालणार नाही. त्याप्रमाणे एखादा मुसलमान जर असे म्हणाला, की मी भारतीय नागरिक आहे त्याप्रमाणे मुसलमान आहे, माझ्या सर्व जीवनाचे नियमन कुराण आणि हदिस यांच्याकडून होते, इस्लाम पारलौकिक जीवन आणि ऐहिक जीवन असा भेद करीत नाही, इस्लामच्या सर्व ऐहिक आज्ञांना पारलौकिक अंग असते आणि म्हणून इस्लामने मला कोणत्याही बाबतीत जसे आचरण करायला सांगितले आहे त्याच्यात कोणताही फेरफार करणारा कायदा करायचा संसदेला अधिकार नाही, तर तेही चालणार नाही. असे मानणारा हिंदू किंवा मुसलमान वास्तविक आपले भारतीय नागरिकत्व गमावून बसलेला असतो. भारतीय राज्यघटनेच्या मूलभूत तत्त्वांशी सुसंगत ठरेल असे आचरण करण्याची समान जबाबदारी जशी सर्वधर्मीयांवर आहे, त्याप्रमाणे भारतीय राज्यव्यवस्थेच्या संदर्भात सर्वधर्मीयांचे समान स्थान आहे. कोणत्याही विशिष्ट धार्मिक परंपरेला विशेष प्रामाण्य नाही आणि कोणत्याही धार्मिक समाजाला विशेषाधिकार नाही. हा सर्वधर्मसमभावाचा नागरी आशय झाला.

पण नागरी जीवनापलीकडे जाणारे जे धार्मिक जीवन असते त्याच्या संदर्भात सर्वधर्मसमभावाचा अर्थ मुस्लिमांच्या दृष्टीने काय असेल ? एखादा नास्तिक मुसलमान जर आपण घेतला, म्हणजे मुसलमान कुटुंबात जन्मलेली, इस्लामी संस्कृतीत वाढलेली पण प्रौढपणी एकंदर विचार केल्यानंतर ईश्वर असे काही नाही व म्हणून त्याचा कुणी प्रेषित असण्याचा प्रश्नच नाही या निष्कर्षाला आलेली व्यक्ती घेतली तर ती सर्वधर्मसमभावी असतेच. कारण इस्लाम धरून सर्व धर्मांचे प्रामाण्य ती नाकारते. अनेक असत्ये घेतली तर त्यांच्यांत तारतम्य करण्याचे कारण नसते. सर्व धर्मांचे प्रामाण्य अशी व्यक्ती सारखेच नाकारते.

तेव्हा आपला प्रश्न सश्रद्ध मुसलमानांविषयी आहे. सश्रद्ध मुसलमानांची इस्लामवर श्रद्धा असते. इतर धर्मांवर नसते. हा सश्रद्ध मुसलमान असण्याचा अर्थ आहे. सर्वधर्मसमभावी मुसलमानाने सर्व धर्मांवर समान श्रद्धा ठेवली पाहिजे असे म्हणणे विपरित ठरेल. आपण असे म्हणू या, की त्याने इतर सर्व धार्मिक श्रद्धांविषयी समान आदर बाळगला पाहिजे.

इतर धार्मिक श्रद्धांविषयी आदराची वृत्ती असण्यात काय अभिप्रेत असते ? आदर औपचारिक असू शकतो किंवा खराखुरा असू शकतो. उदा., सभ्य माणूस त्याच्याकडे कुणीही पाहुणा आला तर त्याच्याशी औपचारिक आदराने वागतो. म्हणजे त्याला मान देतो, त्याचे बोलणे नम्रपणे आस्थेने ऐकून घेतो, इ. ह्या आतिथ्यामध्ये आदराचा आविष्कार असतो. पण ह्या आविष्कारामागे आदराची खरीखुरी भावना असते असे नाही. आलेला पाहुणा पूर्णपणे अनोळखी माणूस असेल. त्याच्याविषयी आदर बाळगायला काही कारण असणार नाही, म्हणजे ज्यांच्यामुळे त्याच्या विषयी आदर बाळगावा असे काही गुण

अनुक्रमणिका




त्याच्या ठिकाणी आहेत हे ज्ञान असणार नाही आणि ह्या परिस्थितीत त्याच्याविषयी खरीखुरी आदराची भावना असणार नाही.

खरीखुरी आदराची भावना आदरविषय असलेल्या व्यक्तीच्या अंगी असलेल्या श्रेष्ठ गुणांच्या व कर्तृत्वाच्या दर्शनावर आधारलेली असते व तिचा एका प्रकारचा स्वाभाविक आविष्कार असतो; उदा., आदरणीय व्यक्तीचा मान करणे, मान करण्याचे जे सामाजिक संकेत असतात त्यांना अनुसरून तिच्याशी वागणे, तिच्याशी वागताना नम्रभाव धारण करणे, इ. श्रेष्ठ, वाखाणण्यासारख्या गुणांच्या दर्शनाशी जी निगडीत असते आणि जिचा एका विशिष्ट प्रकारे आविष्कार होतो अशी भावना ही आदर ह्या भावनेची व्याख्याच आहे. खऱ्याखुऱ्या आदराच्या भावनेचा आणि तिच्या स्वाभाविक आविष्काराचा अनुभव आपल्याला असल्यामुळेच औपचारिक आदर प्रसंगी दाखविणे आपल्याला शक्य होते. औपचारिक आदर एकमेकांना दाखवावा हा सभ्य माणसांमधील संकेत असतो.

इस्लामच्या अनुयायाने इतर धार्मिक श्रद्धांविषयी खराखुरा आदर बाळगणे आवश्यक आहे. असे सर्वधर्मसमभावामध्ये अंतर्भूत आहे असे मानू या. ह्याचा अर्थ असा होईल, की या इतर श्रद्धांमध्ये आदरणीय असे काहीतरी आहे, त्यांच्यांत सत्याचा, प्रामाण्याचा निदान अंश आहे असे त्याने मानले पाहिजे. धार्मिक श्रद्धेत विश्व आणि मानव यांच्या स्वरूपाविषयीचे एक दर्शन, मानवी जीवनाच्या अंतिम व परिपूर्ण साफल्याविषयीची एक संकल्पना, हे साफल्य साधून देणाऱ्या जीवनमार्गाची एक संकल्पना स्वीकारलेली असते. तेव्हा इतर धर्मांविषयी आदर बाळगायचा तर त्या, त्या श्रद्धेत स्वीकारण्यात आलेले दर्शन व संकल्पना यांच्यांत प्रामाण्याचा निदान अंश आहे हे मान्य केले पाहिजे.

पण इस्लामच्या अनुयायाने इस्लामचा श्रद्धेने स्वीकार केलेला असतो हे त्याच्या व्याख्येतच अंतर्भूत असते. इस्लामवरील या श्रद्धेचा आणि इतर श्रद्धांच्या प्रामाण्याच्या दर्शनाचा सुसंगत समन्वय कसा साधता येईल ? वर सुचविलेला मार्ग असा, की इतर श्रद्धांमध्ये प्रामाण्याचा अंश आहे असे मानावे. मी इस्लामचा स्वीकार करतो कारण इस्लाम पूर्णपणे प्रमाण आहे; पण मी इतर धर्मांचा आदर करतो कारण त्यांच्यांत प्रामाण्याचा अंश आहे. ह्या अंशामुळे ते आदरणीय ठरतात व मला त्यांचा मनापासून खराखुरा आदर करता येतो.

पण हा मार्ग टिकू शकत नाही. एक तर जर इतर धर्मांमध्ये प्रामाण्याचा केवळ अंश असेल तर अप्रामाण असा अंशही असणार आणि त्या प्रमाणात ते कमीअधिक अनादरणीय ठरणार. ह्या भूमिकेत इस्लाम पूर्णपणे प्रमाण आहे हे स्वीकारलेले आहे आणि इस्लामचे माप लावून इतर धर्मांमध्ये कितपत प्रामाण्य आहे हे ठरविण्याचा प्रयत्न आहे. म्हणजे येथे सर्वधर्मसमभाव नाही. इतर धर्म कमी अधिक असत्य आहेत असेच दर्शन आहे. इस्लाममध्ये पूर्ण सत्य प्रकट झाले असतानाही इतर धर्मीय वेगवेगळ्या असत्यांना आणि आंशिक सत्यांना जे चिकटून बसले आहेत त्यांच्याविषयी मला खराखुरा आदर वाटणार नाही. पण मी असे म्हणेन, की प्रत्येकाला स्वतःची श्रद्धा बाळगण्याचा समान अधिकार आहे आणि त्याने जे पूर्ण सत्य आहे त्याचा स्वीकार करावा असे त्याला आवाहन करीत असतानाच त्याच्या ह्या अधिकाराचा मी आदर करतो. तेव्हा ह्या भूमिकेत धार्मिक सहिष्णुता अभिप्रेत आहे, सर्वधर्मसमभाव नाही. इतर धर्म आपण सहन करीत असतो. जे अनिष्ट आहे, तापदायक आहे ते सहन करायचे असते. पण ते आदरणीय असू शकत नाही. जे आदरणीय असते ते आपण सहन करीत नाही. त्याचे आपण स्वागत करीत असतो.

अधिक महत्त्वाची गोष्ट अशी, की आंशिक प्रामाण्य व पूर्ण प्रामाण्य हा भेद येथे लागू पडत नाही. समजा, अद्वैती दर्शन, जैन दर्शन आणि इस्लामी दर्शन अशी तीन धार्मिक दर्शने आपण घेतली तर ती केवळ एकमेकांहून भिन्न आहेत असे नव्हे, तर ती परस्परविरोधीही आहेत. विश्वातील अंतिम तत्त्वाचे स्वरूप, त्याचा मानवी आत्म्याशी असलेला संबंध आणि मानवी जीवनाचे परमोच्च श्रेय यांविषयीचे



अनुक्रमणिका

परस्परविरोधी सिद्धांत त्यांनी स्वीकारले आहेत. अद्वैत केवल सत्य आणि केवल ज्ञान असलेले ब्रह्म हे अंतिम तत्त्व मानते आणि त्याच्यात विलीन होणे हे जीवात्म्याचे परमश्रेय मानते. जैन मत अनेक भिन्न आत्मे आहेत असे मानते पण ईश्वर मानीत नाही आणि प्रत्येक आत्म्याची परिपूर्णावस्था हे त्याचे श्रेय मानते. इस्लाम एकेश्वरवाद स्वीकारतो, ईश्वर आणि जीवात्मा यांच्यांत अंतिम भेद आहे असे मानतो. ईश्वराच्या आज्ञापालनापासून लाभणारे सुख हे सर्वश्रेष्ठ श्रेय आहे अशी त्याची धारणा आहे. तेव्हा इस्लाममध्ये पूर्ण सत्य समावलेले आहे असे मानून त्याचा निकष इतर धर्मांना लावला तर इतर सर्व धार्मिक श्रद्धा असत्य आहेत, फक्त त्या वेगवेगळ्या प्रकारे असत्य आहेत एवढेच निष्पन्न होईल. आता हे मत स्वीकारूनही इतर धर्मांविषयी सहिष्णुता बाळगता येईल. ह्या भूमिकेशी सुसंगत असा सर्वधर्मसमभावाचा अर्थ लावता येईल. हा अर्थ असा, की इस्लाम सोडून इतर सर्व धर्म हे सारखेच असत्य आहेत. आता इतर धर्मही सर्वधर्मसमभावाचा असाच अर्थ लावू शकतील. उदा., ख्रिस्ती असे मानतील, की ख्रिस्ती धर्म सोडून इतर सर्व धर्म सारखेच खोटे आहेत. तरी पण इतर धर्मांचे अनुयायी आहेत आणि ते आपापल्या पारंपरिक असत्यांना चिवटपणे चिकटून राहतात ही वस्तुस्थिती आहे. सर्व माणसांनी परिपूर्णपणे सत्य असलेल्या इस्लामचा (किंवा ख्रिस्ती धर्माचा) स्वीकार करणे ही आदर्श अवस्था झाली. पण ती लगेच साधता येईल असे नाही. ह्या परिस्थितीत तात्कालिक तडजोड म्हणून सर्वांनी इतर धर्मांविषयी औपचारिक आदर दाखविणे व सहिष्णुता बाळगणे इष्ट ठरेल.

पण एवढ्याने भागत नाही. इस्लामी (किंवा ख्रिस्ती) श्रद्धेत असे अंतर्भूत आहे, की इस्लाम (किंवा ख्रिस्ती धर्म) हा एकमेव खरा धर्म आहे. इस्लामचे म्हणणे असे, की ईश्वराने पवित्र प्रेषिता-द्वारा जे सत्य आणि आचरणाचा जो धर्म प्रकट केला आहे तो सर्व माणसांसाठी आहे. जो कुणी माणूस ह्या सत्याचा स्वीकार करील व ह्या आचरणधर्माचे पालन करील– म्हणजे जो सच्चा मुसलमान असेल – त्याला ईश्वरी प्रसादामुळे शाश्वत सुख लाभेल. पण जो कुणी असे करणार नाही तो शाश्वत नरक-यातना भोगील. तेव्हा सश्रद्ध व सहृदय मुसलमानाला मुसलमानेतरांविषयी अपार करुणा वाटत असणार. ही सारी माणसे नरकाच्या मार्गाने जात आहेत, त्यांना चिरकाल अटळपणे नरकयातना भोगाव्या लागणार आहेत ह्याचे त्याला मोठे दुःख होत असणार. त्यांचे मन वळवून त्यांना इस्लामी श्रद्धेचा स्वीकार करायला उद्युक्त करणे हे आपले सर्वश्रेष्ठ कर्तव्य आहे असे तो मानणार. इस्लामी श्रद्धेचा स्वीकार हा केवळ जीवनमरणाचा प्रश्न नाही. त्याच्या पलीकडे जाणारा हा प्रश्न आहे. अनंत काळाचे सुख आणि अनंत काळाचे असह्य दुःख यांपैकी माणसाच्या वाट्याला काय येणार आहे हे या प्रश्नाच्या उत्तरावरून ठरणार आहे. मुसलमानेतरांविषयी सहिष्णुता पुरेशी नाही, त्यांचे धर्मांतर घडवून आणण्याचे शक्य ते प्रयत्न करीत राहिले पाहिजे अशीच त्याची धारणा असणार. ह्या धारणेशी सर्वधर्मसमभाव कितपत सुसंगत असेल ?

उलट, एखादा सश्रद्ध मुसलमान सर्व धार्मिक श्रद्धा प्रमाण आहेत व म्हणून सर्व समान आदर-णीय आहेत असे मानीत असेल तर त्याचा अर्थ कसा लावता येईल ? ह्या परस्परविरोधी श्रद्धा आहेत आणि तरीही त्या सर्व प्रमाण आहेत असे मानायचे असेल तर मग असेही मानले पाहिजे, की ह्या क्षेत्रात प्रामाण्याचे स्वरूपच असे असते की परस्परविरोधी गोष्टी प्रमाण असू शकतात. आता प्रामाण्याचा अर्थच असा आहे, की जे प्रमाण असते ते कोणत्यातरी निकषाला किंवा तत्त्वाला अनुसरून प्रमाण असते. जर परस्परविरोधी धार्मिक श्रद्धा प्रमाण असतील तर त्यांच्या प्रामाण्याचा निकष हा कोणत्याही विशिष्ट श्रद्धेवर आधारता येणार नाही. तो सर्व विशिष्ट श्रद्धांपलीकडे (किंवा अलीकडे) असलेल्या मानवी मूल्यांवर आधारलेला असावा लागेल. मग आपल्याला असे म्हणावे लागेल, की वेगवेगळ्या विशिष्ट धार्मिक श्रद्धांमध्ये मानवी श्रेयाविषयीच्या भिन्न आणि परस्पर विसंगत अशा संकल्पना अंतर्भूत झालेल्या आहेत. त्या परस्परविसंगत आहेत याचा अर्थ असा, की

अनुक्रमणिका






त्यांचा सुसंगत असा समन्वय साधता येत नाही, ज्याच्यात ही सर्व श्रेये सुसंगतपणे सामावतील अशा एका व्यापक श्रेयाची कल्पना करता येत नाही. उदा., ईश्वरावर भक्ती ठेवून आपली कर्तव्यकर्मे, त्यांची फळे ईश्वरार्पण करून, निष्ठेने करीत राहणे हे श्रेय आणि आपला आत्मा परतत्वात विलीन झाल्याच्या गूढानुभवात तल्लीन होणे हे श्रेय एकाच जीवनमार्गात सामावून घेता येत नाही. पण हे भिन्न व विसंगत जीवनमार्ग प्रमाण आहेत ह्या म्हणण्याचा अर्थ असा होईल, की त्यांच्यांत भिन्न मानवी मूल्यांचा परिपोष होतो आणि म्हणून मानवी जीवनाचे वेगवेगळ्या प्रकारे साफल्य साधणारे असे हे मार्ग आहेत.

ह्या भूमिकेत असे अंतर्भूत आहे, की सर्वोच्च आणि सर्वसमावेशक अशा मानवी श्रेयाची, ज्याच्यात सर्व मानवी श्रेये सुसंगतपणे सामावलेली आहेत अशा परिपूर्ण मानवी श्रेयाची कल्पना करताच येत नाही. माणसाला परस्परविरोधी श्रेयांमधून निवड करावी लागते. श्रेयाची अशी विशिष्ट संकल्पना विश्वाविषयीच्या आणि मानवी जीवनाविषयीच्या ' दर्शना 'शी निगडित असते. ती अशा दर्शनावर आधारलेली असते असे म्हणूया, किंवा श्रेयाची ही संकल्पना स्वीकारल्यावर तिची गृहीतकृत्ये स्पष्ट करण्याच्या प्रयत्नातून हे दर्शन आकाराला येते असे म्हणूया. ही दर्शनेही परस्परविरोधी असतात. ती सर्व प्रमाण आहेत ह्या म्हणण्याचा अर्थ असा, की त्यांतील प्रत्येकाच्या दृष्टीने विश्वाकडे आणि मानवी जीवनाकडे सुसंगतपणे पाहता येते. विश्वाचा आणि मानवी जीवनाचा ' अर्थ ' लावता येतो. पण विश्वाचा एका प्रकारे अर्थ लावता येतो म्हणून दुसऱ्या प्रकारे अर्थ लावता येत नाही असे नाही. ह्या सर्व दर्शनांचा सुसंगत समन्वय साधता येत नाही. परिपूर्ण व सर्वसमावेशक असे सत्य माणसाला उपलब्ध नाही. एक दर्शन दुसऱ्या दर्शनाशी विसंगत आहे हे दिसते. एक स्वीकारले तर दुसरे स्वीकारता येत नाही हे स्पष्ट असते. पण कोणत्याही विशिष्ट दर्शनाच्या अनुरोधाने विश्वाचा अर्थ लावता येतो ह्यापलीकडचे प्रामाण्य त्याच्या ठिकाणी नसते. त्याचे ' वस्तुनिष्ठ ' प्रामाण्य सिद्ध करण्याचे व त्याच्याशी विसंगत असलेल्या दर्शनांचे खंडन करण्याचे साधन माणसाकडे नाही.

थोडक्यात माणूस सान्त आहे. तो अनंताची कल्पना करू शकतो; पण अनंत बनू शकत नाही. माझ्या धर्मात अंतर्भूत असलेले विशिष्ट दर्शन हे परिपूर्ण आणि एकमेव असे सत्य आहे, असे मी ईश्वर असल्याशिवाय जाणू शकत नाही. हे दर्शन ईश्वराकडून साक्षात प्राप्त झाले आहे असे जरी मी मानीत असलो तरी तो माझा दावा असतो, ते ईश्वराचे म्हणणे नसते. ते ईश्वराचे म्हणणे आहे, असे माझे म्हणणे असते. तेव्हा माझ्या विशिष्ट धार्मिक श्रद्धेच्या कोषातून बाहेर पडल्याशिवाय मी सर्वधर्मसमभाव स्वीकारू शकत नाही. आणि आपण जर असे बाहेर पडलो तर आपली इतर धर्मांविषयीची दृष्टी जशी बदलेल, तशीच स्वतःच्या धर्माविषयीचीही बदलेल.



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका







# राजर्षी शाहूमहाराजांचे शैक्षणिक धोरण व कार्य

शेख शब्बीर

कालमानपरत्वे जनतेशी संपर्क साधून सातत्याने आपल्या सुधारणांद्वारे विविध समस्यांचे निराकरण करण्यास समर्थ ठरणाऱ्या विभूतीच इतिहास घडवीत असतात. 'राजा कालस्य कारणम्' हे विधान शाहूमहाराजांच्या ( स. १८९४–१९२२ ) उत्तुंग कार्याच्या संदर्भात अगदी संयुक्तिक वाटते. छत्रपती शिवाजीमहाराजांनंतरच्या या प्रजाहितदक्ष राजाने सत्तेचा उपयोग ध्येयवादी दृष्टीने करून जनतेस शहाणी करून सोडले व आपल्या शिक्षणविषयक सुधारणांनी जनतेची अवनती थोपवून तिला उन्नत करण्यात भरघोस यश संपादित केले. म्हणूनच या लोकोद्धारक नृपतीस विद्याप्रसारक, क्रांतिकारक, योजकतेचा मेरूमणी, समाजपरिवर्तनाचा अध्वर्यू, थोर राष्ट्रपुरुष इ. संबोधिले जाते. संस्थानिकांच्या खाणीतील हा कोहिनूर हिरा ममतेचा आणि समतेचा सागर होता, ज्याचे हृदय सर्व रंजलेल्या–गांजलेल्या लोकांसाठी द्रवत असे. तो महाराष्ट्राच्या विकासाचा एक मोठा स्वाभाविक तरंग होता.[१] वास्तविकपणे शाहूमहाराजांचे अष्टपैलू व्यक्तिमत्त्व म्हणजे अद्ययावत मानसशास्त्रज्ञांना, समाजशास्त्रज्ञांना व राजकीय विचारवंतांना पडलेले एक निरंतरतेचे कोडेच होय. भारताच्या सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक व धार्मिक इतिहासात नेहमी समाजाला मानवी समानतेचे व राष्ट्रवादाला व्यापक तत्त्वाचे अधिष्ठान देणाऱ्या या 'समग्रक्रांती'च्या पुरस्कर्त्याच्या कामगिरीचा उल्लेख सुवर्णाक्षरांमध्ये सदासर्वकाळ होत राहील.

राजकारण व समाजकारणाच्या धकाधकीत गुंतून गेलेल्या या राजाच्या फक्त शिक्षणविषयक धोरणाचा व कार्याचा सापेक्षिकपणे ऊहापोह या शोधनिबंधाच्या संदर्भचौकटीत करण्याचा प्रांजळ प्रयत्न केला गेला आहे.

## शिक्षणविषयक धोरण

राजा असूनही " राजर्षी "[२] म्हणून संबोधिले जाणारे हे शाहू छत्रपती शिक्षणाला समतेची चावी

न. भा. १

आणि उद्योगाची जननी मानत असत. अज्ञानाच्या मनोयंत्राचे काटे फिरविण्याकरिता शिक्षणरूपी चावी भरली की समाजाचा उत्कर्ष होतो, हे त्यांना ज्ञात होते. म्हणूनच ज्ञानाची ज्योत संपूर्ण महाराष्ट्रात तेवत ठेवून या ज्ञानदीपाने पिढ्यानपिढ्या अज्ञानरूपी अंधःकारात गटांगळ्या खाणाऱ्या व अंधश्रद्धा आणि दारिद्र्याच्या खाईत पिचत पडलेल्या अवनत समाजाच्या अंगणी 'ज्ञानगंगा' पोहोचविण्याचे कार्य केले. 'जे जे भेटे निरक्षर ते ते करावे साक्षर' हा ध्येय–ध्यास घेतलेले शाहूमहाराजांचे जीवन म्हणजे शिक्षणकार्याला अर्पण केलेले कमलच होते. त्यांच्या चरित्र व कार्यामध्ये मानवतेच्या हक्कांसाठी तळमळणाऱ्या अंतःकरणाचेच दर्शन घडून येते. ते म्हणत– "शिक्षणानेच आमचा तरणोपाय आहे. शिक्षणाशिवाय कोणत्याही देशाची उन्नती झाली नाही, असे इतिहास सांगतो. अज्ञानात बुडून गेलेल्या देशात उत्तम मुत्सद्दी व लढवय्ये वीर कधीही निपजणार नाहीत. म्हणूनच सक्तीच्या व मोफत शिक्षणाची हिंदुस्थानला अत्यंत गरज आहे."[३] खरेच, माणसाला माणूस म्हणून जगण्याची संधी देणाऱ्या शाहूमहाराजांचे शिक्षणशास्त्र अत्यंत डोळस होते. विद्येसच समाजजीवनाची खरीखुरी संजीवनी मानणाऱ्या या राजाने शिक्षणकार्याच्या माध्यमानेच मागासलेल्या समाजाच्या उद्धारासाठी वाहून घेतले व त्यांच्या या जन-जागृतीच्या प्रबोधनात्मक कार्यामुळेच कोल्हापूर हे शैक्षणिक विचारवंतांचे स्फूर्तिस्थान ठरले.

समाजप्रबोधनाच्या दिशेने कार्यरत असणाऱ्या 'ब्राह्मोसमाज', 'आर्यसमाज', 'प्रार्थनासमाज' व 'सत्यशोधक समाज' यांच्या विचारप्रणालीचा पुढे शाहूमहाराजांच्या कार्याशी अत्यंत जवळचा संबंध आला.[४] शाहूमहाराजांच्या अंत:करणात खोल कुठेतरी फुल्यांच्या प्रेरणेचा स्पर्श झाला व त्यांनी एका हातात सत्यसमाज व दुसऱ्या हातात समता ही निशाणे घेऊन मागास-समाजातील शिक्षणप्रसाराला

अनुक्रमणिका








सर्वतोपरी साहाय्य दिले. वास्तविकपणे शैक्षणिक क्षेत्रातील या अग्रदूताच्या विविध कार्याकरिता महाराष्ट्राने सतत त्यांचा कृतज्ञ राहिले पाहिजे.[५] राजर्षी म्हणाले होते– " मागासलेल्या लोकांच्या उन्नतीकरिता माझे कै. मित्र न्यायमूर्ती रानडे व गोपाळराव गोखले यांनी पुष्कळ श्रम केले. मागासलेल्या लोकांत विद्येचा प्रसार होण्याकरिता विशेष प्रयत्न केले पाहिजेत ही मूळ कल्पना मला त्यांच्यापासून आली. "[६] तत्कालीन शिक्षणसंचालक इ. गाईल्स व इतर शिक्षणतज्ज्ञांचे मार्गदर्शन घेतल्यानंतरच शाहूमहाराजांनी श्री. भास्करराव जाधव, दाजीसाहेब विचारे, जिवाजीराव सावंत इ. मंडळींना या कार्याकरिता आपल्या मदतीला घेतले. राजर्षी शाहू म्हणत– " मी व्यक्तिशः आरंभापासून निर्बल घटकांच्या दयनीय परिस्थितीमुळे त्यांच्याकडे आकृष्ट झालो आहे आणि त्यांचे ते दुःख निवारण करण्याचे आटोकाट प्रयत्न करणे हेच माझ्या राज्यकारभाराचे एकमेव उद्दिष्ट ठरले. याच उद्देशाने मी गेली पंचवीस वर्षे कष्ट करीत आलो आहे आणि त्यांना शिक्षणाच्या सर्व सोयी उपलब्ध करून दिल्या आहेत. "[७]

इंग्रजी शिक्षणापासून भारतवासीयांना तिसरा डोळा आला आहे असे शाहूमहाराज नेहमी म्हणत असत.[८] सर्वजातिधर्मांमध्ये शिक्षणाचा जोपर्यंत प्रसार होत नाही तोपर्यंत त्यांना स्वराज्य देण्यात काही अर्थ नाही, असे त्यांना वाटत असे. म्हणूनच या मागासलेल्या समाजात स्वातंत्र्य-सूर्याच्या रोखाने वाढण्याची क्षमता निर्माण करायची असल्यास शिक्षण हेच एकमेव साधन आहे हे ' सूर्यसत्य ' त्यांना माहीत होते आणि त्याकरिता त्यांनी लोकांना ज्ञानाचे चक्षू दिले.[९] शिक्षणाच्या प्रक्रियेमुळे जेव्हा समाजरचनेत खऱ्या अर्थाने समता व बंधुत्वाची भावना निर्माण होईल, तेव्हाच स्वराज्य सुरक्षित राहील असे त्यांचे ठाम मत होते. शाहूमहाराज एक संस्थानिक असल्यामुळे त्यांनी वेळोवेळी राजनिष्ठा प्रकट केली. त्यांचा ब्रिटिश सत्तेकडे पाहण्याचा दृष्टिकोन व्यक्तिनिष्ठ असला तरी– " सत्ता केवळ अल्पसंख्याक उच्चवर्गीयांच्या हातात जाण्यात स्वराज्याचे पर्यवसान होऊ नये, म्हणून निदान दहा वर्षेपर्यंत तरी आम्हाला जातवार प्रतिनिधी देण्याचा हक्क असला पाहिजे. यामुळे आमचे हक्क काय आहेत याचे आम्हाला शिक्षण मिळेल. एकदा ते आम्हाला समजले म्हणजे जातवार प्रतिनिधित्वाची जरुरी राहणार नाही,"[१०] असे ते म्हणत. स. १८५७ नंतर इंग्रजांनी प्रस्थापित केलेल्या भारतीय विद्यापीठांतून उत्तीर्ण झालेल्या आंग्लविद्याविभूषित पदवीधरांकडे राष्ट्रीय काँग्रेसचे नेतृत्व गेलेले होते व ते देशातील वास्तविकतेकडे पाहण्यास मुळीच तयार नव्हते. याउलट, शिक्षणाबद्दल अपूर्व दृष्टी असणाऱ्या या लोकाभिमुख राजाने मात्र आपल्या शिक्षणकार्याद्वारेच लोकजागृतीच्या चैतन्याची बीजे महाराष्ट्रात पेरून त्यांपैकी कित्येकांची जोरदार रोपटी व टवटवीत कळ्यांचे अवलोकन स्वतःच केले." शिक्षणालाच ते आपल्या अभूतपूर्व सुधारणांचा मूळ पाया मानत असत. ते स्वतः वाचावीर नसून कर्मवीर होते व म्हणूनच सामाजिक सुधारणांबद्दल तोंडाने वडबडणारे पुढारी त्यांना नको होते. " जो छत्रपती जगास पारतंत्र्यात टाकणाऱ्या लोकांना हाकून लावत नाही, त्याचे छत्रपतित्व कसले ? "[११]– असा सवाल करणाऱ्यांना शाहूमहाराजांचे सडेतोड उत्तर होते– " आम्हाला स्वराज्य मिळावे अशी खरोखरीच आमची इच्छा आहे. याच्या योगे आम्हाला जीवनरक्त मिळेल. परंतु याबरोबर माझा ठाम सिद्धांत आहे की, हल्लीची जातिभेदाची शृंखला तोडल्यावाचून आपले चालायचे नाही. ज्यांना राजकारणांत भाग घ्यावयाचा असेल त्यांनी जपानच्या ' समुराई ' वर्गाप्रमाणे याही देशांत प्रत्येक मनुष्याला मनुष्यत्वाचे सर्व अधिकार दिले पाहिजेत. नाहीतर आमच्या हातून मुळीच देशसेवा होणार नाही. "[१२] यावरून स्पष्ट होते, की ते स्वराज्यचळवळीच्या विरुद्ध नव्हते.[१३] त्यांची साम्राज्यनिष्ठा हा डावपेचाचा एक भाग होता. ते अंतर्गतरीत्या इंग्रजांचा द्वेष करत होते. स्वातंत्र्याची तळमळ त्यांच्यात होती आणि म्हणूनच अडाणी जनतेला सुशिक्षित करून अनेकांना स्वराज्याकरिता प्रेरित करण्याचा अप्रत्यक्ष मार्ग त्यांनी अवलंबिला होता. ब्रिटिश सत्ताधिकाऱ्यांबद्दलच्या आकर्षणामुळे त्यांच्या राजर्षीपणाला बाधा निर्माण होण्याचे काही कारण नव्हते, कारण दोन्ही भूमिका वेगवेगळ्या होत्या.








आपल्या अठ्ठावीस वर्षांच्या शिक्षणकार्याची वैशिष्टये स्पष्ट करताना राजर्षी शाहू म्हणाले होते– " सामान्य जनतेच्या शिक्षणाची सोय करणे, त्यांचे जीवनमान उंचावणे, समाजातील अंधश्रद्धा नाहीशी करणे आणि मानवा–मानवांमध्ये वाढलेली विषमता कमी करणे ही आमची वैशिष्टये आहेत."[५] अर्थातच शाहूमहाराजांचा कटाक्ष हिंदू धर्मातील विद्यमान विषमतेकडे होता व जोपर्यंत या उच्च-निम्न भावना नष्ट होणार नाही, तोपर्यंत हिंदुस्थानची सर्वांगीण उन्नती होणार नाही असे त्यांना वाटत असे. ब्रिटिश साम्राज्याचे उच्चाटन झाल्यावर पांढरपेशा देशभक्तांच्या हाती सत्ता आल्यानंतर लोकांचे दास्यत्व नष्ट होणार नाही, असा त्यांचा विश्वास होता. म्हणूनच ह्या हाडाचा मराठा असलेल्या राजाने शिक्षणरूपी गनिमी कावा पत्करून कुंभकर्णासारख्या निद्रावस्थेत असणाऱ्या समाजाला खडबडून जागे केले व स्वावलंबनाची शिकवणूक त्यांना दिली. शिक्षणप्रसाराच्या माध्यमानेच समाजोन्नती गाठायचे पवित्र कार्य पत्करलेल्या राजर्षींनी स्पर्शास्पर्शाचे बंड मोडून उच्चतर जातीच्या लोकांनी स्वराज्याची जबाबदारी ओळखावी व सर्व प्रजाजनांना बांधव समजून, निःपक्षपातीपणाने त्यांना विद्या द्यावी अशीच आशा वेळोवेळी व्यक्त केली आहे. शाहूमहाराजांच्या या विचारसरणीचाच पुरस्कार त्या काळात इतरांनी केलेला आढळतो– " आम्ही सामाजिक सुधारणेला प्राधान्य देत असलो तरी स्वातंत्र्य मिळाले तर तेही आम्हाला हवे आहे. उच्च वर्गाने इतरांना आपल्या बरोबरीचे स्थान देऊन त्यांचे सहकार्य मिळविले तरच स्वातंत्र्याच्या चळवळीला खरा जोर चढेल, एरवी चढणार नाही. "[६] अवनत बहुजन समाजाच्या उद्धाराकरिता शिक्षणाची ढाल वापरणाऱ्या या राजाबद्दल काहूर उठविण्याचे अनेकदा प्रयत्न झाले व पुण्याच्या काही वृत्तपत्रांनी शाहूमहाराजांना 'ब्राह्मणांच्या पाठीत खंजीर खुपसणारा' असे संबोधित केल्यावर आपले मत व्यक्त करताना महाराजांनी म्हटले होते– " ब्राह्मण जर धावत असतील तर आमच्या जवळ फक्त चालण्याची शक्ती आहे. जर आम्हाला चालायची संधीच दिली नाही तर आम्ही स्वतःच्या पायांवर कधी उभेही राहू शकणार नाही. " अर्थात अंत्यजांपासून वंजाऱ्यापर्यंत शिक्षणाची सोय करून त्या लहान पक्ष्यांमध्ये गरुडाशी टक्कर देण्याचे सामर्थ्य ज्या लोकप्रिय शासकाने निर्माण केले, त्याला १९२१ मध्ये नरसोपंत केळकरांनी 'केसरी'च्या अग्रलेखामध्ये जेव्हा 'स्वराज्यद्रोही छत्रपती' संबोधिले, तेव्हा महाराष्ट्रातील ब्राह्मणेतर समाज भयंकर भडकला व ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर समाजाची वृत्तपत्रे एकमेकांची उणीदुणी काढण्यात इतकी मग्न झाली, की परस्पर हस्तपत्रिकांचा सडा पुण्याच्या गल्लोगल्ली पडू लागला. [७]

अज्ञान, अंधश्रद्धा व दारिद्र्य या तीन महान शत्रूंनी शाहूकालीन बहुजन समाज वेढलेला होता. म्हणूनच विद्येत मागासलेल्या जातिजमातींतील व्यक्तींसाठी सरकारी नोकऱ्यांतील जागा विस्तृत प्रमाणात ( ५०% ) राखून ठेवण्याचा हुकूम महाराजांनी २६ जुलै, १९०२ रोजी लंडनहून काढला– " अलीकडे कोल्हापूर संस्थानमधील सर्व वर्गांच्या प्रजाजनांच्या शिक्षणाला उत्तेजन देण्याचे प्रयत्न करण्यात आले आहेत. परंतु विशेष मागासलेल्या जातींत हे प्रयत्न अपेक्षेप्रमाणे फलद्रूप झाले नाहीत. ही परिस्थिती काही अंशी दूर करण्यासाठी या वर्गांकरिता विस्तृत प्रमाणात संस्थानच्या नोकरीत जागा राखून ठेवण्याचा महाराजांचा कृत निश्चय आहे. " हा क्रांतिकारक ठराव जाहीर केल्यावर एकंदर संख्येने मुंबई प्रांतातील फक्त ५ टक्के असणाऱ्या ब्राह्मणांच्या राज्यकारभारातील मक्तेदारीला प्रचंड हादरा बसला व कोल्हापूरच्या 'समर्थ' पत्राने यावर बरेच अकांडतांडव केले.[८] निश्चितच त्यांच्या या आदेशामुळे १८९४ साली सार्वजनिक क्षेत्रातील अधिकारावर असलेले ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर यांचे प्रमाण ८५.५ : १४.५ असे होते, ते १९२० साली १३.८ : ६८.२ वर आले.[९] नोकऱ्यांच्या आकृतिबंधाला शाहूमहाराजांनी दिलेल्या या सामाजिक प्रातिनिधिक स्वरूपामध्ये सर्वच मागासलेल्या जातींना प्राधान्य देण्यात आले. स. १९०१ मध्ये त्यांनी मोफत सक्तीच्या शिक्षणाची योजना आखली व ११ सप्टेंबर, १९१७ पासून या योजनेची अमलबजावणी केली. २४ जुलै, १९१७ रोजी एक हुकूम

अनुक्रमणिका

काढून त्यांनी प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचे केले– "शिक्षणास योग्य वयाच्या मुलांची यादी प्रसिद्ध झाल्यापासून तीस दिवसांच्या आत मुलांच्या आई–बापांनी आप-आपली मुले शाळेत पाठवावीत." [२०] हे फर्मान समाज-कल्याणाचे 'सुवर्णपान' ठरले. "प्राथमिक शिक्षण सक्तीचे करण्याअगोदर सध्या उपयोगात असलेली शाळागृहे विस्तृत हवेशीर केली पाहिजेत व तिकडे खर्च करण्याची जास्त आवश्यकता आहे"– असे वृत्त 'केसरी' ने प्रतिपादित केल्यामुळे अनेकांचा राग अनावर झाला. यावर उत्तर देताना राजर्षी शाहूंनी इंग्लंडमधील मजूर पक्षाच्या धोरणाची पुनरावृत्ती करून ( No Cake to a few untill all are served with bread ) स्पष्ट केले, की येथे ९० टक्के लोक उपाशी असताना त्यांच्या कोंड्याची सोय न करता १० टक्के लोकांच्या पोळीवर साजूक तूप वाढा असे म्हणणाऱ्यांना रयतेबद्दल किती जिव्हाळा आहे हे उघड होते.[२१] आपली सक्तीची शिक्षणयोजना क्रियान्वित करण्याकरिता शाहूमहाराजांनी १६ ऑगस्ट, १९१८ रोजी शिक्षणविषयक कराचा एक कायदा केला व कोल्हापूर संस्थानातील शंभर रुपयांहून अधिक उत्पन्न असणाऱ्या लोकांवर 'शिक्षण कर' बसविला. प्रत्येक घरामागे ८ आणे ते १ रु. वार्षिक शिक्षण कर आकारून नियमितपणे गोळा केलेल्या रकमेतून त्यांनी शिक्षण कार्यास मदत केली व गरिबांसाठी श्रीमंतांनी काही सहन करायला पाहिजे ही जाणीव–जागृती निर्माण करून शिक्षणकार्यातून सामाजिक परिवर्तन घडविण्याची जबाबदारी त्यांनी पार पाडली. शिक्षणप्रचाराच्या कार्यामागील उद्दिष्ट स्पष्ट करताना ते म्हणाले होते– "माझ्या रयतेमध्ये प्राथमिक व उच्च शिक्षणाचा प्रचार करण्याची माझी इतकी जोराने खटपट चालली आहे ; यावरून शक्य तितक्या लवकर रयतेस स्वराज्य देण्याचे माझे धोरण आहे हे आपल्या ध्यानी येईलच."[२१] एखाद्या रखरखीत वाळवंटामध्ये अनपेक्षितपणे हिरवागार टापू पाहून मन जसे प्रसन्न होते, तसेच राजर्षी शाहूंच्या या विचाराने तत्कालीन अवनत समाजाला आनंद झाला असेल हे निःसंदेह म्हटले जाऊ शकते.

## शिक्षणकार्य

शाहूमहाराजांचे व्यक्तिमत्त्व अत्यंत क्रियाशील होते. म्हणूनच त्यांनी शिक्षणाला समतेची गुरुकिल्ली मानून कोणत्याही प्रकारचा भेदभाव न करता सर्वांकरिताच शिक्षणाची द्वारे खुली केलीत. महात्मा ज्योतीराव फुले यांनी प्रकाशमान केलेल्या ज्योतीनेच शिक्षणाच्या ज्योतीला तेवत ठेवण्याचे, तिचा भरमसाट प्रसार करण्याचे उत्तरदायीत्व पार पाडले. महाराष्ट्रीय समाजात ऐक्य व साम्यतेचा पुरस्कार करून त्यांनी शिक्षणकार्यात अशा प्रकारे नेत्रदीपक यश संपादित केले ज्याची शिक्षणक्षेत्राच्या इतिहासात तोड नाही. आपल्या समाजातील व्यक्तींच्या सुखदु:खांना स्वतःचीच सुखदुःखे मानणाऱ्या या युगप्रवर्तक शासकाने आपल्या प्रयत्नांमुळेच 'दक्षिणेतील काशी' म्हणून नावलौकिक मिळविलेल्या कोल्हापूर नगरीला 'शिक्षण काशी' चा बहुमान प्राप्त करून दिला. या सुप्रसिद्ध विद्याप्रसारकाने असंख्य अज्ञानी समाजास ज्ञानाच्या प्रकाशांत आणण्याकरिताच सर्वप्रथम प्राथमिक शिक्षणाला प्राधान्य दिले. ते लोकशिक्षणालाच लोकशाहीचा आधारस्तंभ मानत असत. समाजातील प्रत्येक व्यक्तीला आपल्या हक्कांचे व कर्तव्याचे उत्तरदायीत्व पटवून देण्याकरिता, संपूर्ण समाजास सूज्ञ बनविण्याकरिता, उच्च शिक्षणाचा टप्पा गाठण्याकरिता व स्वराज्याची फळे पुढे योग्यपणे त्यांना चाखता यावी म्हणून राजर्षी शाहूंनी वेळोवेळी अनेक शिक्षणसंस्थांना आर्थिक मदत दिली. त्यांनी कुर्तकोटीच्या विनंतीप्रमाणे एका समितीची नियुक्ती करून तिच्या शिफारशीनुसार, बंद होण्याच्या बेतात असलेल्या कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजला, आर्थिक साह्यय दिले. पुण्यातील डेक्कन एज्यूकेशन सोसायटीच्या फर्ग्युसन महाविद्यालय व इतर संस्थांना आणि श्री शिवाजी मराठा सोसायटीशी संलग्न असणाऱ्या विविध संस्थांना सक्रीयपणे साह्यय देण्याचे कार्य त्यांच्या हातून पार पडले.

आपल्या शिक्षणप्रसाराचे स्वप्न साकार करण्याकरिताच राजर्षी शाहूंनी पुरोहित शाळा (१९१२), युवराज शाळा, पाटील शाळा (१९१३), उद्योग शाळा (जयसिंगराव घाटगे टेक्निकल इन्स्टिटयूट– १९१२), संस्कृत शाळा (१९१७), सत्यशोधक शाळा (१९१३), सैनिक शाळा (इन्फंट्री स्कूल,





श्री शिवाजी प्रिपरेटरी मिलिटरी स्कूल) इ. संस्थांची उभारणी केली. त्यांनी संपूर्ण महाराष्ट्रात विविध क्षेत्रांतील शिक्षणसंस्था प्रस्थापित करून शिक्षण-प्रसाराची पताका डौलसपणे फडकवीत ठेवली. या विभिन्न संस्थांमार्फत त्यांनी समाजात नवचैतन्य निर्माण करण्याकरिताच पुरोहितांची नवीन व्यवस्था अमलात आणली. गावातील पाटीलांना आपला कारभार सुज्ञपणे पाहता यावा म्हणून त्यांच्या शिक्षणाची सोय केली. उद्योग व व्यवसायांतून समाज-समृद्धी घडवून आणण्याकरिता उद्योगशाळा काढल्या. सर्वांना संस्कृत भाषेची दालने उपलब्ध व्हावीत म्हणून करवीर येथील शंकराचार्यांच्या मठात संस्कृतशाळा स्थापन केली. मराठा पलटणीला देशसेवेचे व पराक्रमाचे उच्च शिखर गाठता यावे याकरिता लष्करी शाळा स्थापन केल्या व अशा प्रकारे शिक्षणकार्यास वाहून घेतलेल्या या कमलाने स्वतःचा देह चंदनापरी झिजवून आपले जीवित मंगल आणि चिरंजीव केले.

शाहू महाराजांनी कोल्हापूरला ' विद्यार्थी वसतिगृहांची जननी ' हा बहुमान प्राप्त करून दिला. विशिष्ट जातीय वसतिगृहे प्रस्थापित करण्याची गरज अपरिहार्यपणे राजर्षींना भासली असली, तरी त्याचे पर्यवसान जातिजातींतील भेदभाव नष्ट होण्यात व देशप्रेमाची भावना निर्माण होण्यात व्हावे, असे त्यांचे मत होते. या दृष्टीनेच त्यांनी सुरू केलेल्या बहुतेक वसतिगृहांत अनेक जातिधर्मांचे विद्यार्थी राहत असत. त्यांच्या वसतिगृहात्मक अभिनव शिक्षणपद्धतीमुळे या क्षेत्रातील विशिष्ट वर्गाची मिरासदारी नष्ट होऊन समाजाच्या सर्व थरांत शिक्षणाबद्दल कुतूहल निर्माण झाले. शिक्षणाची द्वारे सर्वांकरिता मोकळी झाल्यामुळे दुय्यम व उच्च शिक्षणाला चालना मिळाली. याच अभिनव योजनेमुळे असंख्य अग्रगण्य कार्यकर्ते उदयास येऊ शकले, ज्यांनी पुढे राजकारण, समाजकारण, साहित्य, कृषी, सहकार व इतर विविध क्षेत्रांत मोलाची कामगिरी बजावली आहे. " या वसतिगृहांत राहणाऱ्या विद्यार्थ्यांमध्ये प्रारंभापासूनच राष्ट्रप्रेम, सहकार्य, ऐक्य, स्वावलंबन, शिस्त, सहिष्णुता इ. विविध गुण जोपासले गेले व त्यामुळेच जातिभेदाची तीक्ष्ण धार बोथट होऊन अनेकांना स्वयंप्रयत्नातून स्वोद्धार घडवून आणण्यास प्रेरणा मिळाली. एकट्या कोल्हापूर शहरातच शाहूमहाराजांनी व्हिक्टोरिया मराठा बोर्डिंग ( १९०१ ), दिगंबर जैन बोर्डिंग ( १९०१ ), वीरशैव लिंगायत विद्यार्थी वसतिगृह ( १९०६ ), मुस्लिम बोर्डिंग (१९०६), मिस क्लार्क होस्टेल (१९०८), दैवज्ञ शिक्षण समाज बोर्डिंग ( १९०८ ), श्री नामदेव बोर्डिंग ( १९११ ), पांचाल ब्राह्मण वसतिगृह ( १९१२ ), श्रीमती सरस्वतीबाई गौड सारस्वत ब्राह्मण विद्यार्थी वसतिगृह ( १९१५ ), इंडियन ख्रिश्चन होस्टेल ( १९१५ ), रावबहादूर सबनीस प्रभू बोर्डिंग ( १९१५ ), आर्यसमाज गुरुकुल ( १९१८ ), वैश्य बोर्डिंग ( १९१८ ), ढोर-चांभार बोर्डिंग ( १९१९ ), शिवाजी वैदिक विद्यालय वसतिगृह ( १९२० ), श्री प्रिन्स शिवाजी मराठा बोर्डिंग हाऊस ( १९२० ), सुतार बोर्डिंग (१९२१), नाभिक विद्यार्थी वसतिगृह (१९२१), सोमवंशीय आर्यक्षत्रिय बोर्डिंग ( १९२० ), श्री देवांग बोर्डिंग ( १९२० ) अशी एकंदर वीस व कोल्हापूरबाहेर पुण्याला छत्रपती ताराबाई मराठा बोर्डिंग ( १९२० ), अहमदनगरला श्री छत्रपती करवीर चौथे शिवाजी महाराज मराठा बोर्डिंग ( १९२० ), नागपूरला चोखामेळा वसतिगृह ( १९२० ) आणि नाशिकला श्रीशाहू छत्रपती बोर्डिंग ( १९१९ ), उदाजी मराठा वसतिगृह ( १९२० ) वंजारी समाज वसतिगृह ( १९२० ) इ. वसतिगृहे काढून अज्ञ समाजावर जे उपकार त्यांनी केले, त्याची कोणत्याही प्रकारे परतफेड करता येऊ शकणार नाही. होतकरू विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्त्या, प्रशस्त इमारतीत राहण्याची व्यवस्था, सुग्रास जेवण, पुस्तके, फी-माफी, कपडे, धोबी, केशकर्तन, दिवाबत्ती इ. ची सोय करून शिक्षणाविना अंधःकारामध्ये पिचत पडलेल्या या मुलांचे जीवन उजळविण्याचे पवित्र कार्य करून प्रगतीचे नवीन क्षितिज गाठण्याकरिता त्यांना महाराजांनी चालना दिली. अनेक होतकरू व निर्धन विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणासाठी राजर्षी शाहूंनी विदेशी पाठविले व खाजगीतून त्यांना आर्थिक साहाय्य दिले. मध्यप्रदेश, कर्नाटक, गुजराथपासून अनेक जातिधर्मांच्या








विद्यार्थ्यांनी या सवलतीचा लाभ घेऊन आपले जीवन आनंदमय बनविले. महाराजांनी स्थापन केलेली ही वसतिगृहे म्हणजे त्यांच्या परिश्रमाची जिवंत स्मारकेच आहेत व याच अर्थाने ते भारतातील विद्यार्थी-वसतिगृहांचे आद्य जनक ठरतात.

याप्रमाणे विभिन्न जाति-धर्मांच्या लोकांकरिता वसतिगृहात्मक शिक्षणाची व्यवस्था प्रस्थापित करून 'नवभारता'ची उभारणी करण्याचे श्रेय राजर्षी शाहूंना आहे. त्यांची शिक्षणविषयक योजना ही एखाद्या ओढ्याप्रमाणे नव्हती की ज्याचा प्रवाह काही अंतरावर जाऊन वाळवंटामध्ये वा इतरत्र लुप्त होत असतो; तर ती योजना म्हणजे अशा गंगोत्रीच्या संथ प्रवाहाप्रमाणे होती जी सातत्याने पुढची मजल गाठण्याकरिता प्रयत्नरत असते व शेवटी समाज-सुधारणांच्या अथांग सागरात जाऊन विलीन झाल्यावरच समाधान प्राप्त करते. त्यांच्या या शिक्षणरूपी वाऱ्यांच्या माऱ्यामुळे महाराष्ट्रातील मागासवर्गीय समाजावर पसरलेले विविध समस्यांचे ढग हळूहळू ओसरू लागले. शाहूमहाराजांनी निर्धन, दलित व अवनत जाति-जमातींसाठी लागू केलेल्या शिक्षणविषयक व इतर सुधारणा बघून राष्ट्रपिता महात्मा गांधींनी राजर्षींच्या कार्याला "निःस्वार्थ मिशनरी भावनेचे अद्वितीय उदाहरण" असे संबोधिले आहे.[१४] राजर्षी शाहूंची विधवा सून राणी इंदुमतीदेवीचे शिक्षक श्री. भार्गवराव शाहूमहाराजांच्या शिक्षणविषयक तत्त्वांना पारखून त्यांना "Really a Philosopher Prince" असे संबोधितात, तर महाराजांचे आदरणीय गुरू एस. एम. फ्रेझर म्हणतात– "Outstanding features which explain Sir Shahu Chatrapati's work is his combination of a broad humanity with uncompromising courage."[१५] लोकाभिमुख राजर्षी शाहूंच्या शिक्षणविषयक विचार व कार्याला बघून तर आपणा सर्वांची अशी खात्री पटते, की ही विभूती म्हणजे नि:स्वार्थ भावनेने आरंभिलेली एक संस्थाच होती, एक विद्यापीठच होते. महाराजांनी सुरू केलेल्या शैक्षणिक व सांस्कृतिक चळवळीमुळे महाराष्ट्रातील समाज खडबडून जागा होईल व ब्रिटिशांच्या राजवटीवर त्याचा विपरित परिणाम घडून येईल अशा प्रकारच्या राजर्षींच्या विरोधकांच्या चिथावणीवरून जेव्हा महाराजांना इंग्रज सरकारने दमदाटी करून गप्प बसविण्याचा प्रयत्न केला, तेव्हा त्यांचे रोखठोक उत्तर होते– "तुम्ही मला पदच्युतीच्या बुरखेबाज धमक्या कशाला देता? तशी वेळ येण्यापूर्वीच मी होऊन राजीनामा देईन; पण बहुजनसमाजाच्या उद्धाराचे जे पवित्र कार्य मी हाती घेतले आहे, ते प्राण जाईतोवर हा शाहू सोडणार नाही."[१६] शिक्षणकार्याद्वारे महाराष्ट्राच्या समाजात बांधीलकी निर्माण करणाऱ्या व आपली अस्मिता फुलविणाऱ्या या राजर्षी शाहूमहाराजांच्या निधनानंतर त्यांच्या कामगिरीचे मूल्यमापन करताना मद्रासच्या 'Justice' या वृत्तपत्राने त्यांना 'A Prince among men and a man among Princes' असे संबोधिले तर 'Times of India' या वृत्तपत्राने म्हटले होते– "कोल्हापूरचे छत्रपती हे दुसऱ्या कालखंडात जन्माला आले असते, तर त्यांनी साम्राज्य स्थापन केले असते." या द्रष्ट्या पुरुषाच्या कामगिरीमुळे त्याला महाराष्ट्रातील वा भारतातीलच नव्हे तर संपूर्ण जगातील सामाजिक सुधारणांच्या इतिहासात अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झालेले आहे व म्हणूनच पश्चिम जर्मनीतील विद्यापीठात नावलौकिकास पात्र ठरलेल्या सिर्कसियांझ यासारख्या राज्यशास्त्राच्या प्राध्यापकाकडून व इतर विदेशी विद्वान मंडळींद्वारे शाहूमहाराजांच्या जीवनकार्याचा गहनतम संशोधनात्मक अभ्यास केला जात आहे.

## संदर्भग्रंथ-सूची :

१. वा. द. तोफखाने– 'राजर्षी श्रीशाहूछत्रपती यांचे अंतरंग' (१९६३), पृ. १९; 'आगामी हिंदीस्तान' साप्ताहिक (१९४०–ठळकवाडी, बेळगाव, वा. द. तोफखाने); कर्मवीर वि. रा. शिंदे– 'सत्यवादी (कोल्हापूर) : राजर्षी शाहू छत्रपती खास अंक', १९७४, पृ. ४४.

२. ग. कृ. कुन्हाडे– 'महाभारत काळानंतर राजर्षिपदाचे पहिले मानकरी' – पी. बी. साळुंखे ( संपादित ) ' राजर्षी शाहू गौरव ग्रंथ ', ( १९७६ ); पृ. २४५–४६ – कानपूर येथील कुर्मी समाजाच्या १३ व्या अखिल भारतीय अधिवेशनात २१ एप्रिल, १९१९ रोजी बॅ. नियोगी व स्वामी परमानंद यांच्या प्रस्तावाला मद्रासच्या कनकरत्नम व कोल्हापूरच्या मडिवाळप्पा नावलगी यांचे अनुमोदन मिळून हा किताब शाहूमहाराजांना बहाल करण्यात आला.

३. २७ डिसेंबर, १९१७ रोजी खामगाव येथे अखिल भारतीय शिक्षण परिषदेच्या ११ व्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदावरून बोलताना श्याम. ना. येडेकर ( संपादित ) ' किता ', पृ. ४.

४. रा. तु. भगत– ' राजर्षी शाहू : शिक्षणविषयक विचार आणि कार्य ', १९८१, पृ. ४.

५. भाई माधवराव बागल (संपादित)–' हंटरकार खंडेराव गोपाळराव बागल यांचे निवडक लेख ', १९७४, पृ. ५७; प्रभाकर वैद्य– ' महात्मा फुले आणि त्यांची परंपरा', १९७४, पृ. ८४,९२.

६. श्याम ना. येडेकर ( संपादित ) – ' राजर्षी शाहू छत्रपती यांची भाषणे ', पृ. १६.

७. धनंजय कीर– ' राजर्षी शाहू छत्रपती, ' पृ. ३९३; किता, पृ. ३३.

८. भ. बा. जाधव ( संपादित )– ' राजर्षी श्रीशाहूमहाराजांची भाषणे ', पृ. ४१.

९. रा. तु. भगत– तत्रैव– दोन शब्द ( प्रस्तावना ).

१०. किता, पृ. ७

११. प्रबोधनकार के. सी. ठाकरे ( संपादक ), ' प्रबोधन पाक्षिक ', मुंबई, १६ मे, १९२२; धनंजय कीर– ' लोकमान्य टिळक राजर्षी शाहू महाराज– एक मूल्यमापन, ' १९७१. पृ. १३३.

१२. पंडित सातवळेकर– ' विश्ववृत्त ' मासिक, कोल्हापूर–' प्रार्थनांची तेजस्विता' (लेख).

१३. माधवराव बागल– ' बहुजन समाजाचे शिल्पकार ', १९६६, पृ. १८.

१४. श्रीमन्महाराज शाहू छत्रपती सरकार करवीर यांची भाषणे, पृ. ४,५,९, १०.

१५. रा. तु. भगत– तत्रैव, पृ. ८२.

१६. वा. रा. कोठारी– ' जुन्या आठवणी, ' पृ. ७५.

१७. ग. त्र्यं. माडखोलकर– ' राजर्षींचे लोकोत्तर व्यक्तिमत्त्व ', पृ. ३४४; के. सी. ठाकरे ( प्रबोधनकार )– ' कोदंडाचा टणत्कार ', पृ. ५७९; पी. बी. साळुंखे ( १९७६ )– तत्रैव.

१८. २६ जुलै, १९०२ च्या कोल्हापूर गॅझेटात प्रसिद्ध झालेले फरमान; आ. बा. लठ्ठे– ' श्रीमच्छत्रपती शाहूमहाराज यांचे चरित्र ', पृ. १४२.

१९. वि. ना. घुगे– ' छत्रपती शाहूमहाराजांची अर्थरचना, ' – पी. बी. साळुंखे, तत्रैव, पृ. १९१.

२०. किता : हु. न. २०२ : २५–७–१९१७, भा. १, पृ. ८९.

२१. १५ एप्रिल, १९२० रोजी नासिक येथील उदाजी मराठा वसतिगृहाच्या पायाभरणी समारंभाच्या वेळी अध्यक्षपदावरून बोलताना.

२२. १५ एप्रिल, १९२०– नासिक– तत्रैव.

२३. मा. श्री. शिंदे– 'भारतीय विद्यार्थी-वसतिगृहांचे आद्य जनक' – पी. बी. साळुंखे– तत्रैव, पृ. ६८.

२४. आ. बा. लठ्ठे– तत्रैव, पृ. १४३; धनंजय कीर, १९७१, तत्रैव, पृ. १२८-२९.

२५. रा. तु. भगत ( १९८१ ) – तत्रैव, पृ. ३१; वा. द. तोफखाने ( १९६३ ) तत्रैव, पृ. ८०.

२६. माधवराव बागल– ' श्री शाहूमहाराज यांच्या आठवणी ', पृ. ३०१; ना. ज्ञा. पाटील– इतिहासाला कलाटणी देणारा महापुरुष ', पी. बी. साळुंखे– तत्रैव, पृ. ३२७.



अनुक्रमणिका

# शरद् पाटीलकृत 'दासशूद्रांची गुलामगिरी' : एक परीक्षण

बाळ गांगल

प्राचीन भारतीय समाजाची जडणघडण, तिच्यामागे दडलेली आर्थिक-राजकीय-धार्मिक-भौगोलिक कारणे, तिच्या संबंधात तत्कालीनांनी आणि उत्तरकालीनांनी केलेला विचार, ह्या सर्वच गोष्टी बुद्धीला भुरळ घालणाऱ्या आणि आव्हान देणाऱ्या आहेत. अस्पृश्यता आणि गुलामगिरी हे असेच डोक्याला अत्यंत पीडा देणारे विषय. "नरेंचि (का?) केला हीन किती नर," म्हणून आपल्या अन्तःकरणाला वेदना होतात आणि कारणे न आकळल्याने बुद्धी कुंठित होते.

'दासशूद्रांची गुलामगिरी' हा ग्रंथ पाहण्यात आल्यावर म्हणूनच फार आनंद वाटला. ग्रंथाच्या आवरणावरील महापंडितांचे– डॉ. रोमिला थापर, डॉ. इर्फान हबीब, डॉ. धर्मेन्द्रनाथ शास्त्री, प्रा. मे. पुं. रेगे, प्रि. अ. भि. शहा– अभिप्राय पाहून तर छाती दडपून गेली. शरद् पाटलांच्या ग्रंथाची एकूण 'युगप्रवर्तक कृती' म्हणून भलावण करण्यात आली आहे. ग्रंथाला प्रकांडपंडित लक्ष्मणशास्त्री जोशी यांची प्रस्तावना लाभली आहे.

ह्या सगळ्या दडपणाखाली ग्रंथ वाचायला घेतला आणि, दुःखाने नमूद करावेसे वाटते, प्रचंड निराशा पदरी आली.

तर्कतीर्थांनी प्रस्तावनेत म्हटले आहे, की इतिहास-संशोधनाच्या (१) साम्राज्यवादी आणि (२) राष्ट्रीय-अस्मितासंवर्धक असा दोन पद्धतींत 'सत्यशोधनाला आवश्यक असणाऱ्या अलिप्त आणि तटस्थ संशोधकदृष्टीला मर्यादा पडल्या'. (पृष्ठ दोन) तर्कतीर्थवर्णित आणि शरद् पाटील स्वीकृत चौथी पद्धत 'एक विशिष्ट प्रकारचे ऐतिहासिक तत्त्वज्ञान ध्यानात घेऊन'...... 'विशेषत: कार्ल मार्क्सच्या ऐतिहासिक भौतिकवादाच्या दृष्टिकोनातून भारताच्या इतिहासाचे, समाजरचनेचे, सामाजिक संस्थांचे, धर्माचे आणि तत्त्वज्ञानाचे अर्थपूर्ण विश्लेषण करून निष्कर्ष काढून' मांडणे. तिला अनुसरून 'या विद्वान् लेखकाने' 'कथांचे, धार्मिक रीतिभातींचे व विशेषतः संस्कृत, प्राकृत व अन्य भाषांतील विशिष्ट शब्दप्रयोगांचे नवीन नवीन अर्थ व्युत्पादून दाखवण्याचा व्यापक असा प्रयत्न' केलेला आहे.



ऐतिहासिक भौतिकवादाचा दृष्टिकोन स्वीकारल्याबरोबर सत्यशोधनाला आवश्यक असे 'अलिप्तता' आणि 'तटस्थता' हे गुण नित्य सहयोगी (Invariably Concomitant) म्हणून उपस्थित होतात, ह्या समजाला स्वयंमन्य बौद्धिक औद्धत्याखेरीज दुसरा कोठलाही पुरावा नाही. 'नवीन नवीन अर्थ व्युत्पादून दाखवण्याचा व्यापक प्रयत्न' भाषाशास्त्राच्या, शब्दार्थिकी (Semantics)–च्या विरुद्ध जात असेल तरी, लेखकाने ऐतिहासिक भौतिकवादाचा दृष्टिकोन स्वीकारल्यामुळे, ग्राह्य आणि स्तुत्य ठरतो, असा दंडक कुणी घालू शकतो काय? धार्मिक विधिनिषेध, अंधश्रद्धा, सामाजिक रीतिरिवाज ह्या सर्वांकडे पूर्वनिश्चित निर्णय सिद्ध करण्याच्या हट्टाने पाहिल्यामुळे 'अलिप्तता' आणि 'तटस्थता' दूर राहण्याची शक्यता अधिक. ह्या ग्रंथातील पानोपानी त्याचे पुरावे मिळतात.

'अर्थात आपली अन्वेषणपद्धत केवळ मार्क्सवादी नाही' असे शरद् पाटलांनी सांगितले आहे. पण मार्क्सचा पुरा त्यागही केलेला नाही. आपल्या अन्वेषणपद्धतीला पाटील यांनी १९७८ सालापासून 'मार्क्सवादी-फुले-आंबेडकरवादी' असे नाव दिलेले आहे. मार्क्सवाद आणि फुले-आंबेडकरवाद यांची सांगड घालणे (ऊर्फ गल्लत करणे) कितपत इष्ट आहे? उद्या एखाद्याने आपल्या तत्त्वज्ञानाला आणि विश्लेषणपद्धतीला गांधी–हिटलर–माओवादी नाव दिले, तर तो नेमका काय-वादी आहे, हे कळणे दुरापास्त. (खरं म्हणजे दूरापास्त.)

अनुक्रमणिका

तशा पाहिल्या तर क्षुल्लक, पण पुस्तकभर टोचत राहणाऱ्या त्रुटींचा समाचार पहिल्याप्रथम घेऊ या. शरद् पाटलांच्या ग्रंथाची भाषा भारदस्त, प्रौढ आणि संस्कृतप्रचुर मराठी आहे. पण अत्यंत अप्रचलित ( आणि अर्थात चुकीच्या ) लकबी शरद् पाटलांनी आपल्या मराठीलेखनाच्या घाटणीत का स्वीकारल्या आहेत, हे काही कळत नाही. मराठीत अकारान्त पुल्लिंगी नामाला प्रत्यय लावण्यापूर्वीचे सामान्यरूप आकारान्त होते हे सर्वज्ञात आणि सर्वत्रश्रुत आहे (उदा. देव→ देवा+ला, असुर→ असुरा+ला, भगत→ भगता+ला). शरद् पाटील ते रूप अनेकत्र अकारान्तच ठेवतात. उदा.–

'दुर्ग'– च्या म्हणण्याप्रमाणे ( पृ. ९३ ), असुरध्नच्या (पृ. २७७),

'दुर्ग' –च्या मते (पृ. १४१), वृत्र– च्या (पृ. २८८),

'हाल' च्या ( पृ. २८३ ), अम्भृण– ची कन्या (पृ. १७३).

बरं, आकारान्त सामान्यरूप पाटलांना माहीत नाही असे नाही. उदा. देशाचा इतिहास ( पृ. चार), भारतीयापेक्षा (पृ. चार), विद्वद्वराने (पृ. पाच). गंमत अशी झाली असण्याची शक्यता आहे, की ज्या मूळ हिंदीवरून शरद् पाटलांनी आपली उद्धरणे घेतली त्यातील अकारान्त सामान्यरूपे अनवधानाने (म्हणजेच) निष्काळजीपणाने मराठीत घुसली. शरद् पाटलांसारख्या विद्वानाने "'त्वष्ट्र' चा मुलगा" (पृ. ८४), "त्वष्ट्र" ( पृ. १४१ ) असे अशुद्ध प्रयोग का वापरले आहेत ?

ब्राह्मण (ग्रंथ ह्या अर्थाने), निरुक्त ह्या नपुंसकलिंगी शब्दांना पाटलांनी जबरदस्तीने पुल्लिंगी बनविले आहे.

"शतपथ ब्राह्मण आज्ञा करतो ( पृ. ८४ ), निरुक्त सांगतो ( पृ. १४०, १७२ ), व्युत्पत्ती देतो (पृ. १४१), दाखवतो, ऐतरेय ब्राह्मण सांगतात, महाभारत म्हणतो ( पृ. ३८५ )" वगैरे वगैरे. उदाहरणांची यादी लांबवता येईल; पण आवश्यकता नाही. बरं, महाभारत आणि निरुक्त ह्या शब्दांचे नपुंसकत्व शरद् पाटलांना माहीतच नाही, असे नाही. म. भा. म्हणते ( पृ. २८९ ), निरुक्त म्हणते ( पृ. २८८ ) हेही शब्दप्रयोग प्रस्तुत पुस्तकातच सापडतात.

काही संस्कृत सामासिक शब्दांची पाटलांनी पार दुर्दशा करून टाकली आहे. 'रजोस्त्राव' (पृ. ११९, १२०), पुनर्प्राप्ती (पृ.११९), मृत्योत्तर (पृ.१५८), पुनसंयोग (पृ. २०३) वगैरे. हे शब्द वाचताना डोळ्यांना आणि उच्चारल्यावर कानांना पीडा देतात. त्यांची शुद्ध रूपे 'रजःस्राव', 'पुनःप्राप्ती', 'मृत्यूत्तर', 'पुनःसंयोग' का वापरली नाहीत ? तर्कतीर्थांनी ज्यांची विद्वान म्हणून भलावण केली आहे, अशा पाटलांनी चक्क 'महान्तम'(पृ.२४७) असा शब्द वापरावा ? बरं, महत्तम हे शुद्ध रूप पाटलांना माहीत आहे. ( पृ. २५० वर 'महत्तम राजा' हा शब्दप्रयोग येतो. म्हणजे ज्या नामाला तम भाववाचक विशेषण लावायचं, तेही ( राजा ) पुल्लिंगी आहे, तेव्हा पुल्लिंगी विशेषण 'महान्' चे तमभाववाचक तसेच करण्याचा मोह पाटलांना झाला, असेही म्हणता येत नाही. आणखी एकाच विशेष खटकणाऱ्या अशुद्धाकडे अंगुलिनिर्देश करतो. 'सरस्वतीचे पाणी गोड, अन्नदा. ... (पृ. १३८) असा प्रयोग पाटलांनी केला आहे आणि अन्यत्र 'घोड्याचे गर्भदा वीर्य ( पृ. २५९ ) असा. पाणी आणि वीर्य ह्या नपुंसकलिंगी नामांना अन्नदा, गर्भदा ही स्त्रीलिंगी विशेषणे का लाविली आहेत ? मूलसदृश शब्द वापरायचे होते, तर अन्नद, गर्भद अशी रूपे करता आली असती. पण त्याहीपेक्षा रूढ मराठीला साजेशी 'अन्नदायक', 'गर्भदायक' रूपे चटकन समजण्यासारखी झाली असती आणि लिङ्गविपर्ययही टळला असता. एकूण ह्या युगप्रवर्तक कृतीत लेखनाच्या चुका भरपूर आहेत. अर्थात, त्यामुळे युगप्रवर्तन थांबेल असे नव्हे; पण नसत्या तर बरे झाले असते.

आता, पाटलांच्या प्रतिपाद्याचा परामर्श ! 'भारतीय गुलामगिरीचा प्रश्न' ह्या आपल्या पहिल्या प्रकरणात शरद् पाटलांनी लिहिलेली पहिली दोन वाक्ये अशी आहेत– 'प्राचीन भारताचे पहिले धननिर्माते– वरकड मालाच्या अर्थी–दास व शूद्र होते. सुमारे ३००० वर्षे त्यांनी ऊर फुटेतो, अखंडपणे केलेल्या श्रमांनी जी महान भारतीय संस्कृती

जन्माला घातली व पोसली, तिनेच त्यांच्या गुलामगिरीच्या बेड्या घडवल्या व घट्ट केल्या.' ह्या दोन वाक्यांत अनाठायी आक्रस्ताळेपणा आणि अयोग्य दोषारोप ठासून भरलेले आहेत. मार्क्सने 'दास कापिताल'मध्ये म्हटले आहे, "All surplus value, whatever particuler (profits interest or rent) it may subsequently crystallize into, is in substance the materialization of unpaid labour." मार्क्सच्या म्हणण्याप्रमाणे कुणाकडून तरी वेतनविरहित काम करून घेतल्याखेरीज वरकड माल पैदा होत नाही. वरकड माल उत्पन्न झाल्याखेरीज संस्कृतीची विविध अंगे–धर्म, वाङ्मय, कला, शास्त्रे, न्यायव्यवस्था–जोपासण्यासाठी लागणारा वेळ समाजाच्या काही घटकांना मिळत नाही. हा प्रकार सर्वत्र घडतो आणि आजही घडत आहे. भारताने काही विशेष दुष्ट प्रथा जन्माला घातली असे नव्हे. मार्क्सच्या सिद्धांताचा व्यत्यास (converes) असा मांडता येईल; Materialization of unpaid labor is surplus value. जिथे जिथे संस्कृतीचा विकास होत असेल, तिथे तिथे वरकड माल पैदा होत असला पाहिजे, तिथे तिथे कुणाच्या तरी श्रमाचे मूल्य चुकते होत नसले पाहिजे किंवा श्रमाच्या खऱ्या किमतीपेक्षा कमी चुकते होत असले पाहिजे. कम्यूनिस्ट देशांतही संस्कृतीचा विकास होत असतो, त्या अर्थी तेथेही उघड किंवा छुप्या स्वरूपात unpaid labour अस्तित्वात असला पाहिजे आणि तेथेही 'गुलामगिरीच्या बेड्या घडवल्या व घट्ट केल्या' जात असल्या पाहिजेत. "सुमारे ३००० वर्षे 'ऊर फुटेतो' केलेल्या श्रमांनी," ह्या शब्दप्रयोगाचा अर्थ भाषिकदृष्ट्या आणि ऐतिहासिक दृष्टया केवळ अनाकलनीय आहे. औद्योगिक क्रांतीचा प्रादुर्भाव आणि शिरकाव सर्वत्र होईपर्यंत हजारो जाती, जमाती निसर्गाने पुरविलेल्या अन्नावर आपला गुजारा करीत असत. वरकड माल निर्माण करण्यासाठी आपले श्रम खर्ची घालण्याची त्यांना कधी आवश्यकता वाटली नाही. 'दास' ह्या अत्यंत संदिग्ध शब्द सोडून दिला तरी, अगदी पारंपरिक विचारानसारसुद्धा, संपत्तीचे निर्माते भारतीय समाजात वैश्य होते. त्यांच्या मालाचे कमी मूल्य त्यांना क्षत्रिय राजेरजवाड्यांकडून, सरदारदरकदारांकडून मिळाले असेल; पण त्यामुळे ते कोठल्याही अर्थाने 'गुलाम' ठरू शकत नाहीत. इषुकार, मणिकार, तांबट, लोहार, कुंभार, सुतार, रथकार, सोनार, बुरूड, कासार, शिंपी, न्हावी, चांभार, कोळी, माळी, कोष्टी ... असे शेकडो व्यावसायिक–अगदी शोषित होते असे मानले तरी– 'ऊर फुटेतो' काम करीत होते आणि 'गुलाम' होते, असली विधाने करण्यास काडीमात्र पुरावा नाही. 'वैदिक संस्कृतीचा विकास' ह्या आपल्या ग्रंथात "शूद्र म्हणजे 'गुलाम' नाही" हे विधान शरद् पाटलांच्या ग्रंथाला 'पुरस्कार' देणाऱ्या तर्कतीर्थांनी अनेकवेळा अनेक संदर्भांत केलेले आहे. उपर्युक्त ग्रंथात पृ. २४८ वर तर्कतीर्थ म्हणतात, 'ऋग्वेदापासून वर्तमानकाळापर्यंतच्या कोणत्याही कालखंडात भारतीय समाजसंस्था गुलामगिरीच्या अर्थशास्त्रावर आधारलेली सापडत नाही.' पृ. २४९ वर लक्ष्मणशास्त्री म्हणतात, 'हे दास्य म्हणजे ॲरिस्टाटलने वर्णिलेल्या समाजव्यवस्थेतले दास्य नव्हे'. पृ. २५० वर 'एकंदरीत तात्पर्य असे, की दाससंस्था हा भारतीय समाजसंस्थेचा पाया कोणत्याच काळात नव्हता.' पुनश्च, 'शूद्रसंस्था ही दाससंस्था नव्हती. नाहीतर प्राचीन भारतीय संस्कृती मृत्युमुखात सापडली असती. ज्या ज्या अतिप्राचीन संस्कृती मृत्युवश झाल्या त्या सर्वांचा पाया दाससंस्था होती ... वैभवापेक्षा आत्मा श्रेष्ठ आहे; ते मूळ आहे. आत्मा म्हणजे माणूस. जीवनाचे सर्वस्व तेथून उगम पावते. गुलामगिरीची संस्था आत्म्याचे मूल्य अवमानिते. त्या मूल्याचे विसर्जन करते. म्हणून आत्मघातकी होते. भारतीय संस्कृती दीर्घकाळ टिकून राहिली याचे कारण दाससंस्था हा तिचा आधार नव्हता' आणि अन्यत्र (पृ. २४८) 'शूद्र स्वतःच्या देहाचे, श्रमाचे, अर्थोत्पादक हत्यारांचे आणि भूम्यादि संपत्तीचे मालक होते.'

लक्ष्मणशास्त्री जोशी ब्राह्मणपक्षपाती किंवा ब्राह्मण्यपक्षपाती आहेत, असा आरोप कोणीही करणार नाही. त्यांच्यासारख्या प्रकांड, व्युत्पन्न पंडिताने पुनःपुन्हा ठासून सांगितले आहे, की शूद्र म्हणजे गुलाम नव्हे. आणि भारतात गुलामगिरीची

प्रथा केव्हाही नव्हती. जी प्रथा लक्ष्मणशास्त्र्यांना शोधशोधून सापडत नाही, ती शरद् पाटलांना करतलामलकवत् स्पष्ट आणि स्वच्छ दिसते, हे आश्चर्यच ! पाटलांचा अट्टाहास असा, की भारतात गुलामगिरी नव्हती, ही काही फारशी इष्ट गोष्ट नव्हे; ती मी सिद्ध करून दाखवीन! पाटलांची 'अन्वेषणपद्धती शुद्ध वर्गीय नाही, तर वर्णजातिवर्गवादी (म्हणजे जे काय असेल ते असो) आहे.' तिच्या साहाय्याने ते भारतीय संस्कृतीवरील हा महान् कलंक– गुलामगिरीचे अनस्तित्व– प्रक्षाळायला सरसावले आहेत. कौटिल्यासारख्या कट्टर साम्राज्यवाद्याने 'न तु एव आर्यस्य दासभावः' ही घोषणा कंठरवाने केली असली तरी! कारण 'विशिष्ट शब्दप्रयोगांचे नवीन नवीन अर्थ व्युत्पादून दाखवण्याचे कसब त्यांच्यापाशी आहे. एवढेच नव्हे तर अस्तित्वात नसलेले शब्द टंकविण्याची (Coin) अप्रतिम हातोटीही त्यांच्यापाशी आहे. 'गणमाता' हा असा एक शब्द. ऋग्वेदात गणशब्द (गणश्री, गणपति समाविष्ट) चाळीसपेक्षा अधिक वेळा येतो; 'मातृ' शब्द शंभराहून अधिक वेळा येतो. पाटलांना अभिप्रेत असलेला 'गणमाता' हा शब्द आणि तन्निर्दिष्ट संकल्पना ऋग्वेदीय कवींना का सुचला/ली नसेल ? ७८ संदर्भ देऊन लिहिलेल्या 'कुलटा ते गणिका' ह्या आपल्या प्रकरणात पाटलांच्या मनात जन्मलेल्या 'गणमाते' चे खूपच विस्तृत वर्णन आहे, पण ती प्रत्यक्षात कोठे खरोखरच अस्तित्वात होती काय, ह्याचा पत्ता लागत नाही. पृ. १२३ वर अंबपाली ही वज्जि संघगणाच्या 'गणदेवतेची पुजारीण' बनलेली आपल्याला आढळते. पण गणदेवता नावाची कुणी पूजनीय वस्तू गौतमबुद्धाच्या काळात होती आणि यल्लम्मा देवीसारख्या तिला वाहिलेल्या कुणी पुजारिणी असत, हे कुठेच सिद्ध होत नाही. बरं, ही गणमाता गणसंपत्तीची वाटणीही करीत असे. ऋग्वेदातील पाटीलप्रणीत आणखी एक गणमाता म्हणजे सरमा. [ पाटील म्हणतात 'शब्दशः अर्थ नदीमाता.' ऋग्वेदीय प्रथेप्रमाणे– उदा. पृश्निमातरः, सिन्धुमातरम्, सप्तमातरम्– नदीमाता हा सामासिक शब्द बहुव्रीही मानायचा की पाटलांना अभिप्रेत असावासा वाटतो ( कारण स्पष्टीकरण काहीच नाही ) त्याप्रमाणे कर्मधारय मानायचा, हा प्रश्न सोडून दिला तरी. ] सरमा ही देवशुनी, इन्द्रदूती म्हणून प्रसिद्ध आहे. पणींनी चोरलेल्या गाईंचा माग काढायला इन्द्राने तिला पाठवले होते, हेही खरे; पण ती गणमाता कशी काय बनली? ती कोठल्या गणाची माता होती ? आणि गणदेवतेची पूजा करण्याचे तसेच गणसंपत्तीची वाटणी करण्याचे पाटीलदत्त धार्मिक आणि सामाजिक–आर्थिक कार्य करण्याचे सोडून ती इन्द्राचे दौत्य करायला का जाते ?

सरमेचे गणमातृत्व गृहीत धरल्यावर त्याच्या पुष्ट्यर्थ पाटील जी अर्थचलाखी करतात, ती अपूर्व आहे. पाटील म्हणतात– '१०.१०८.२० या ऋचेत (सरमा) पणींना सांगते की, ना ती बंधुत्व जाणते ना भगिनीत्व.' कारण त्यांना अ-भ्राता ह्या शब्दाला स्वाभिप्रेतार्थ चिकटवायचा आहे. त्यासाठी मग उपनयन, अरबांमधील स्त्रियांची सुंता वगैरे आडवळणे घेऊन पाटील 'अभ्राता' पदाच्या मार्गावर येतात. 'गणमाता' ही आजन्म कुमारी असे आणि आपल्या गणसदस्यांशी लैंगिक संबंधात ती अनियंत्रित असे. म्हणून अभ्राता या शब्दाचा अर्थ 'नातेवाईकांशी लैंगिक संबंधात अनिर्बंध असलेली' असा व्हायला पाहिजे.

व्हायला पाहिजे, ही गोष्ट कितीही निकडीची असली, तरी सरमेच्या संदर्भात होत नाही, होणे शक्य नाही ह्याची पाटलांना पूर्ण जाणीव आहे. सरमेने गाईंना लपवून ठेवलेली जागा शोधून काढल्यावर पणी तिला लाच देऊ पाहतात, लाडीगोडी लावतात. ती लावताना पणिमुख्य म्हणतो, 'स्वसारं त्वा कृणवै' म्हणजे 'मी तुला बहीण बनवतो', त्यावर सरमा उत्तर देते 'ना हं वेद भ्रातृत्वं नो स्वसृत्वम्' म्हणजे 'मी असले ( उपटसुंभ ) बन्धुत्व किंवा भगिनीत्व जाणत नाही.' 'इन्द्र आणि घोर अङ्गिरस् तुमच्या ह्या बाता जाणतात ...' वगैरे. येथे नातेवाईकांशी अनिर्बंध लैंगिक संबंध असण्याचा किंवा नसण्याचा काहीही संबंध नाही. योग्य संदर्भ गाळण्याची हातचलाखी पाटलांनी का केली आहे ? बरं, इथे केली; पण पृष्ठ ३१५ वर, वेगळ्या संदर्भात, पणींना स्त्रीसत्ताक व मातृवंशक बनवताना नेमकी मागील ऋचा भाषान्तररूपाने उद्धृत केल्याने ती उघडी पडली आहे. पाटीलकृतत्र अर्थ– 'परत

अनुक्रमणिका

जाऊ नकोस; आमची भगिनी बनून राहा; कल्याणी, आम्ही तुला आमच्या गुराढोरांत वाटा देऊ.'

मातृसत्ताकतेच्या प्रतिष्ठापनासाठीही पाटील अशीच गंमत करतात. पृष्ठ १४३ वर " मातृसत्ताकतेला भारतीय शब्द आहे 'स्त्रीराज्य', स्त्रीची सत्ता. या शब्दाचा आद्यतम उल्लेख महाभारतात ( १२.४.७ ) येतो." शब्दाचा आद्यतम उल्लेख महाभारतात असला, तरी 'राजा होण्यासाठी पुरुषाला स्त्रीसत्ताक राज्याच्या स्त्रीवारसाशी लग्न करावे लागायच्या प्रथेचा निःसंदिग्ध निर्देश खुद्द ऋग्वेदातच मिळतो. उर्वशी आपला पती पुरूरवस् याला १०.९५.५ या ऋचेत सांगते. या ऋचेचा कोसंबी सर्वोत्कृष्ट अनुवाद करतात— "दिवसातून तीन वेळा तू माझ्या ( योनी ) त लिंगाचा मारा करीत होतास, आणि तू ( माझी इच्छा नसतानाही ) मला गर्भवती केलेस. पुरूरवा, मी तुझ्या कामनांच्या आधीन झाले. वीरा, मग तू माझ्या शरीराचा ( तन्वस् ) राजा झालास." (पृ. १५०) पण उर्वशी चिरकुमारी असल्यामुळे कोणालाही आपल्या शरीराचा 'राजा' मानू शकत नव्हती.' आठ ओळींपूर्वी " उर्वशी आपला पती पुरूरवस् " वगैरे उल्लेख पाटलांनी स्वतःच केला आहे. पुरूरवस् उर्वशीचा पती होता, पण ती चिरकुमारी असल्याने ती त्याला आपल्या शरीराचा 'राजा' मानू शकत नव्हती, हे काय गौडबंगाल आहे ? बरं, सर्वोत्कृष्ट अनुवाद करणारे कोसंबी ' इतर वैदिक पंडितांप्रमाणे ' तन्वस् ' हा शब्द षष्ठीत घेतात; ( ते काही पाटलांना मान्य नाही ) पण तो जर पंचमीत घेतला तर ते उपवाक्य पुढीलप्रमाणे होईल— "वीरा, मग तू माझ्या शरीरापासून राजा झालास." ( पृ. १५१ ). शरीरापासून राजा होणे ही काय भानगड आहे, अशी शंका रहायला नको, म्हणून पाटील उकल करतात, ' देवी वा राष्ट्री उर्वशीशी विधिपूर्वक संभोग वा देवविवाह करण्यातूनच पुरूरवा राजा झाला. ' स्त्रीद्वेष्टया वैदिक पंडितांनी स्त्रीराज्यसंकल्पना दडवून ठेवण्यासाठी ' तन्वस् ' शब्द षष्ठयन्त मानणे क्षम्य नसले, तरी, समजण्यासारखे आहे. पण स्त्रीराज्य-संकल्पनापुष्टिकारक असा तो शब्द पञ्चम्यन्त न मानता, उपर्युक्त पंडितांना अनुसरून कोसंबींनी केलेला अनुवाद सर्वोत्कृष्ट प्रमाणपत्र देण्यास योग्य कसा ?

महाभारतीय युद्ध ' हा लढा पितृसत्ताक कुरू गण व स्त्रीसत्ताक पांडव गण यांच्यांत झाला असावा असे ( पाटलांना ) दिसते. द्रौपदीचे वास्तविक व्यक्तिमत्त्व हा तर्क सिद्ध करते. द्रौपदी ही पांडवाची "साधारणी " पत्नीच नव्हती, तर त्या गणाची देवीही होती. ' ( पृ. १६७ ). ह्या गणदेवीची ' गणमाता ' नावाची, पाटलांनी पूर्वी प्रतिष्ठापित केलेली ' पुजारीण ' कोण असावी ह्याचा पत्ता लागत नाही. बरं, द्रौपदी जर गणाची देवी आणि इन्द्रप्रस्थाच्या राज्याचा आर्थिक व शासकीय कारभार पाहणारी, तर फासे टाकून गणभूमीची वाटणी करायचे पाटीलविहित कर्म सोडून फासे टाकणाऱ्या धर्माने तिला पणाला लावावे अशी तिची अवस्था का झाली ? आणि गणदेवीला पणाला लावायला स्त्रीसत्ताक पांडवगणातला तिचा एक साधारण पती धजला तरी कसा ?

आता कौरव कडवे पितृसत्ताक आणि पांडव चिवट मातृसत्ताक, तरी ते एकमेकांचे चुलतभाऊ कसे, हा प्रश्न तुम्हाआम्हाला पडेल, तसा पाटलांनाही पडला. मग ते विचारतात, " हेच जास्त संभवनीय नाही का की, पांडव हे मध्य वा दक्षिण भारताचा एक स्त्रीसत्ताक वा मातृवंशक गण होते ज्याच्याशी त्यांचे कसलेही नाते नव्हते अशा पितृसत्ताक कौरव गणाशी त्यांचा वारंवार संघर्ष आला ? " ( पृ. १७० ) महाभारताचा, साऱ्या परंपरेचा, इतिहासाचा कौल विरुद्ध असून सुद्धा हेच जास्त संभवनीय, कारण ते शरद् पाटलांच्या वर्णवर्गजातिवादी ( ! ) अन्वेषणपद्धतीशी सुसंगत आहे. ह्या पद्धतीनुसार हिडिंबा आणि बकासुर यांचीसुद्धा स्त्रीसत्ताक, मातृवंशक गणराज्ये होती, असा निष्कर्ष पाटील जाता जाता काढतात; किंबहुना ते गृहीतच धरतात. ह्याच संदर्भात कुलदेवतेसंबंधीचा जो युक्तिवाद पाटलांनी केला आहे तो अद्भुत आहे : " द्रौपदीचे एक नाव पार्वती होते. दुर्गेचे एक नाव पार्वती होते. म्हणून दुर्गा पांडवांची कुलदेवता होती " ( पृ. १७१ ) १९६५ ते १९८३ पर्यंतच्या भारताच्या इतिहासाचे ह्या पद्धतीने विश्लेषण करणारे ५००० वर्षानंतरचे एखादे शरद् पाटील

म्हणतील, "पंतप्रधान गांधींचे एक नाव इंदिरा आहे ( दुसरे प्रियदर्शिनी ), लक्ष्मीचेही एक नाव इंदिरा आहे. भारत हे गणराज्य होते ( यात शंका नाही ) ∴ लक्ष्मी ही अखिल भारतीयांची कुलदेवता होती. त्याकाळी भारतात मातृसत्ताक पद्धती होती. पितृसत्ताकतेचे कडवे पुरस्कर्ते मोरारजी देसाई ह्यांनी १९७७ ते १९८० ह्या काळात मातृसत्ताक इंदिराजींची सत्ता बळकावून घेतली होती" ... इत्यादी, इत्यादी. असो.

'दक्षिणपांचालांच्या राजधानीत झालेल्या द्रौपदीच्या 'बहुपतिक स्वयंवरोत्सवाला' (पृ. २४९) वगैरेंमधून महाभारतावर खूपच चांगला प्रकाश टाकला आहे. इरावती कर्व्यांना किंवा दुर्गा भागवतांना किंवा इतर कुणालाही न जाणवलेला हा महाभारताचा अर्थ फक्त शरद् पाटलांना जाणवला. द्रौपदीचे स्वयंवर मुदलातच बहुपतिक होते. पण कर्णाने जिंकला असता तर? त्याला बिचाऱ्याला बरेचसे भाऊ (असल्याचे माहीत) नव्हते! स्वयंवर बहुपतिक असल्याचे द्रौपदीला माहीत नव्हते, द्रौपदीच्या नातेवाइकांना माहीत नव्हते, स्वयंवराला आलेल्या कुणालाही माहीत नव्हते, कुंतीने 'भिक्षा सर्वांत वाटून घ्या' म्हणेपर्यंत अर्जुनालाही माहीत नव्हते, ते फक्त शरद् पाटलांच्या सूक्ष्म, अन्वेषणदृष्टीला दिसले! प्रमाणग्रंथांतून आपल्या सिद्धान्ताला पुष्टिकारक पुरावे घेणे, पुष्टिकारक नसतील तर अर्थ काही प्रमाणात आपल्याला पाहिजेत तसे वाकविणे ह्या गोष्टी प्रतिबद्ध ( committed ) विचारवंताला कराव्या लागतात, हे मान्य; पण ह्या मान्यतेचा किती फायदा घ्यायचा?

स्त्रीराज्य, स्त्रीसत्ताकता, मातृवंशकता, गणमातृत्व ह्या सर्वच संकल्पनांच्या बाबतीत ग्रंथलेखकाने कमालीची संदिग्धता ठेविली आहे.

परशुराम स्त्रीसत्तेचा कट्टर कैवारी होता (पृ. २२२), सीता ही स्त्रीसत्ताक विदेहांची राष्ट्री (पृ. २२३), विदेहांच्या मातृदेवतेची पुरोहिता अहल्या (पृ.२२३), द्रौपदी पाण्डवगणाची राष्ट्री होती (पृ. १६८) ह्या आणि अशांसारख्या शब्दसंहतीमधून लेखकाला नेमके काय म्हणावयाचे आहे, हे कुठेच स्पष्ट होत नाही. त्यातही पुन्हा 'शाल्व देशाच्या (स्त्रीसत्तेची अभिजात भूमी) राजाला तिने अगोदरच मनाने वरलेले' (पृ. २२५) वगैरे शब्दप्रयोग येतात. स्त्रीसत्ताकांमध्ये कुणी राजा वगैरे नसे, तर तेथील गणमाता कुणाशी तरी नियतकालिक देवविवाह लावीत आणि ते पुरुष अशा राष्ट्रीचे निव्वळ कामदास असत, हा सिद्धान्त लेखकाने पुन:पुन्हा मांडला आहे. मग स्त्रीसत्ताक भूमीत 'राजा' कुठून आला? असल्यास तो तेथील गणमातेचा कामदासच होता की नाही? त्याला स्वतंत्रपणे दुसऱ्या स्त्रीवर प्रेम करण्याचा अधिकार होता की नाही? अंबेसारख्या कुमारिकेचे मन त्याच्यावर जडल्यानंतर तिला स्वीकारण्याचे किंवा नाकारण्याचे (जसे महाभारतातील शाल्वाने केले) स्वातंत्र्य त्याला होते किंवा नाही? हे सर्व प्रश्न अनुत्तरित राहतात.

ह्या संदर्भात 'वीर्यशुल्का' ह्या शब्दाची लेखकाने केलेली कुतरओढ भयानक आहे. लेखकाचे विवेचन असे– '...पण वीर्याचा अर्थ रेत असाही होतो, आणि या अर्थातून सीता ही दाशांची राजकन्या काली व मल्लांची महिषी शीलवती यांच्यासारखी घर्मनटी होते.' (पृ. २२४). वीर्याचा अर्थ रेत असल्याने सीता घर्मनटी कशी काय होते, हे खरोखरच अनाकलनीय आहे. कोणत्याही स्त्रीपुरुषसंबंधात वीर्याचे आदानप्रदान होत असल्याने– कायदेशीर, बेकायदेशीर; खुशीचा, जबरीचा, समाजव्यवस्था पुरुषप्रधान असो स्त्रीप्रधान असो, संबंध म्हटला की त्यातील स्त्री वीर्यशुल्का ठरलीच. आणि सीता घर्मनटी होते, म्हणजे नेमके काय होते? या प्रश्नाचेही उत्तर सापडत नाही. लेखकाच्या प्रतिपादनात खालील मजकूर सापडतो: 'अहल्यांचे घराणे जनकाशी नियतकालिक व स्त्रीप्रधान देवविवाह करी, आणि त्याचे शुल्क असे ज्या पुरुषाशी ती संगत होई त्याचे वीर्य.' (पृ. २२४). अहल्यांचे घराणे, त्यांचे जनकाशी ( की जनकांच्या घराण्यातील पुरुषांशी ? ) नियतकालिक व स्त्रीप्रधान देवविवाह होत असत, ह्या पाटलांच्या म्हणण्याला रामायणात काही पुरावा आहे काय? पुरावा नसला, तरी पुढील अनैतिहासिक, व्याकरणदुष्ट आणि तर्कदुष्ट विधान करायला लेखक मागेपुढे पाहत नाही. विधान असे– 'परंतु सीतेबरोबर, तिला तिच्या पतीच्या घरी रवाना करण्यातून, स्त्रीप्रधान विवाहाचे त्याच्या विरुद्धात, पुरुषप्रधान विवाहात, रूपांतर करण्यात आले.' वरील वाक्यात



अनुक्रमणिका

'सीतेबरोबर' हा शब्द अधांतरी लटकत राहतो, हा भाग सोडला तरी, 'स्त्रीप्रधान विवाहाचे पुरुषप्रधान विवाहात रूपांतर करण्यात आले' ह्या 'कर्मणि' प्रयोगाचा अध्याहृत कर्ता कोण ? वाल्मीकीकडून की रामाकडून की दशरथाकडून की समाजाकडून ? आणि करण्यात पुष्कळ आले; स्त्रीप्रधान समाजव्यवस्था स्त्रीने का सोडली ? त्यासंबंधी काही ऐतिहासिक पुरावा आहे काय ? काही ब्राह्मणांनी काही क्षत्रियांची मुंज लावण्याचे नाकारल्याने ते (म्हणजे क्षत्रिय) शूद्र झाले, ही शूद्रजन्माची आंबेडकरीय उपपत्ती जितकी अनैतिहासिक आणि अतार्किक, तितकीच पाटलांची ही उपपत्तीसुद्धा. आपल्या कुतर्कसोपानाच्या सर्वोच्च पायरीवर चढताना पाटील म्हणतात– 'राम विदेहांच्या स्त्रीसत्ताकतेचे जिवंत व सर्वश्रेष्ठ प्रतीक, पितृसत्ताकतेचा बालेकिल्ला झालेल्या अयोध्येला घेऊन चाललेला होता. म्हणून परशुरामाने त्याला प्राणांतिक द्वन्द्वयुद्धाचे आव्हान दिले.' (पृ. २२४). परशुरामाने असे आव्हान देणे अगदी स्वाभाविक, कारण तो 'स्त्रीसत्तेचा कट्टर कैवारी होता' (पृ. २२२). अयोध्या पितृसत्ताकतेचा बालेकिल्ला केव्हा झाली, तत्पूर्वी ती असा बालेकिल्ला नसताना तिथे कुणाची सत्ता चाले ? सीता स्त्रीसत्ताकतेचे जिवंत प्रतीक हे मान्य, पण सर्वश्रेष्ठ का ? इतर काही कमी दर्जाची प्रतीके इतिहासाला आणि लेखकाला ज्ञात आहेत का ? आणि स्त्रीसत्ताकतेचे जर ती एवढे सर्वश्रेष्ठ प्रतीक, तर ती रामाबरोबर का गेली ? 'वीर्यदान कर आणि चालू लाग' असा खणखणीत हुकूम तिने का फर्मावला नाही ? की वास्तवात फर्मावला होता, पण "पितृसत्ताकतेच्या कट्टर कैवाऱ्याने" – वाल्मीकीने– तो आपणापासून दडवून ठेवला ? रामायण हा राजकीय नसला तरी सामाजिक स्थित्यंतराचा इतिहास आहे, हे जर पाटलांना मान्य असेल, तर त्यांनी ते, जसे आहे तसे, स्वीकारायला हवे, तेथे अर्धजरतीयन्याय का लावावा ? 'परशुराम स्त्रीसत्तेचा कट्टर कैवारी होता' ह्या म्हणण्याला 'शरद् पाटलांनी लेबल लावले म्हणून' ह्यापेक्षा सबळ पुरावा हवा. परशुरामाचे जे चरित्र आपल्याला माहीत आहे त्यात त्याचा स्त्रीसत्तेचा कैवार कुठे आढळत नाही. केवळ पित्याची आज्ञा म्हणून– आईचा दोष आहे की नाही याची चौकशीसुद्धा न करता– तिचे शिर आपल्या कराल परशूने धडावेगळे करणारा परशुराम स्त्रीसत्तेचा कट्टर कैवारी ? मग हिटलरसुद्धा ज्यूंचा कट्टर कैवारी म्हणायला हरकत नाही, कारण 'लेखनी अस्ति इति लेखनीयम्'. असो.

भारतामध्ये गुलामगिरी कशी दृढमूल झालेली होती, हे दाखविणे हा शरद् पाटलांचा मुख्य उद्देश असल्याने त्याचा परामर्श घेऊन हा परीक्षणप्रपंच थांबवू या. गुलामगिरीचे बीज रुजायला, अंकुर वाढायला आणि वृक्ष फोफावायला अत्यंत उपयुक्त भूमी भारतात उपलब्ध होती हे सांगताना, भारताच्या उष्ण हवामानाचा आणि वस्त्राबाबतच्या अत्यल्प गरजेचा उल्लेख करून पाटील म्हणतात– 'म्हणून स्त्रीपुरुषांना जेमतेम जगण्यापुरती किमान अन्न-वस्त्रे देऊन त्यांना कामाला जुंपले जाऊ शके.' (पृ. ३४०–३४१). 'या (म्हणजे नदीवक्र) संस्कृती ज्या उष्ण कटिबंधात उदयाला आल्या त्यापेक्षा शीतकटिबंधात जास्त कपडे व अन्नाची जरूर असते.' (पृ. ३४०). असे आहे, तर शीतकटिबंधातील यूरोपात गुलामगिरी कधीही उदयाला यायला नको होती. कारण जेमतेम जगायलासुद्धा तेथे लोकरीचे किंवा कातड्याचे कपडे अंगभर घालावे लागतात. प्रकार उलटाच झालेला दिसतोय. ग्रीक–रोमन साम्राज्यातील गुलामगिरीबद्दल तिळमात्र शंका नाही. तेथील प्लेटो, ॲरिस्टॉटलसारख्या तत्त्ववेत्यांनी गुलामगिरीचे समर्थन करून ठेवले आहे. जॉर्ज थॉम्सनच्या 'स्टडीज् इन् एन्शंट ग्रीक सोसायटी' शीर्षक ग्रंथाचा हवाला देऊन पाटलांनीच म्हटले आहे, 'अथेन्सचे उद्योग दासश्रमावर चालत होते आणि दासस्वामी आपले दास भाड्याने देऊन प्रचंड नफे कमवीत होते.' (पृ. १५) वगैरे. गाथासप्तशतीचा सांगोपांग अभ्यास करणाऱ्या स. आ. जोगळेकरांनी 'हालसातवाहनाची गाथासप्तशती' ह्या आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत (पृ. २७९) म्हटले आहे, 'प्राचीन युरपियन व मध्य एशियाटिक आणि मध्ययुगीन ख्रिश्चन व इस्लामी देशांच्या इतिहासात जे दिसते ते गुलामीचे रौद्र व करुण स्वरूप भारतात आढळत नाही'...... 'गाथासप्तशतीत

दास हा सामाजिक किंवा आर्थिक अवस्थेचा द्योतक नाही. "तत्पर नोकर", "मालकिणीची मर्जी संपादन करण्यात कुशल" या अर्थाने तो गाथेत आला आहे.'

'दासप्रथाक गुलामगिरी' – शीर्षक उपसंहार-प्रकरणात पाटलांनी 'दासप्रथा, भूदासप्रथा, दास–कर्षित सीता, केरळातील दासप्रथा, स्त्रीसत्ताक कृषि-प्रधान गण', 'गणदासप्रथा', 'ज्ञातिदासप्रथा', 'भक्त–कर्मकर', 'प्रेष्य', 'निमान-प्रथा', 'पुरुष-मेध', 'डागण्याची प्रथा', 'विष्टिप्रथा' वगैरे गोष्टींचा सविस्तर ऊहापोह करून भारतातील दासांचे चार प्रकार मांडले आहेत.

१ युद्धजित, २ गृहजात, ३ क्रीत, ४ दंड. आणखी एक प्रकार निष्कर्षात घातला नसला, तरी वर्णिला आहे. तो म्हणजे पण-दासांचा. पण दासप्रथेची उग्रता (severity) यूरोप, मध्य-आशियातील गुलामगिरी-सारखीच असल्याचा कोणताही निःसंदिग्ध पुरावा मांडलेला नाही. वेद-महाभारत-रामायण-पुराणे ह्यांतील पुराकथांचे आपल्याला हवे तसे निरूपण (interpretation) करून ऐतिहासिक वास्तव मुद्दाम नजरेआड केले आहे. आणि ह्या प्रयत्नात सनातनी आणि साम्यवादी दोघांनाही जवळजवळ एकाच दावणीला बांधले आहे. पाटलांच्या म्हणण्या-प्रमाणे "सनातनी लोक प्राचीन आर्यांना शक्य तेवढे सर्व गुण चिकटवण्याचा प्रयत्न करतात, तर मॉर्गनला बिनशर्त प्रमाण मानणारे मार्क्सवादी लोक आर्यांसह सर्व वर्गविहीन गणसमाजांची 'मानव-जातीचे सुवर्णयुग' अशी व्याख्या करून सनातन्यांचे प्रयत्न परत्वे पुष्ट करतात." पाटलांच्या बाबतीतही त्यांच्याच शब्दांत म्हणता येईल, 'शरद् पाटील प्राचीन आर्यांना शक्य तेवढे सर्व दोष चिकटवण्याचा प्रयत्न करतात.' पाटलांचे दुःख काय आहे? सनातन्यांच्या प्रयत्नांना मार्क्सवाद्यांकडून बळ मिळा-ल्याचे? की वर्गविहीन समाजांना 'सुवर्णयुग' म्हणताना मार्क्सवाद्यांनी आर्यांना खड्यासारखे वगळले नाही, याचे? प्राचीन भारतात अत्यंत निर्दय स्वरूपाची गुलामगिरी अस्तित्वात होती, असे सिद्ध झाल्याने ज्या प्रमाणे इतिहासाच्या विद्यार्थ्यांना वाईट वाटण्याचे कारण नाही, त्याच-प्रमाणे तसल्या गुलामी पद्धतीचा प्रादुर्भाव येथे झाला नाही ह्याचे एवढे दुःख ग्रंथलेखकाला का व्हावे? त्यासाठी ग्रंथलेखकाची पुराकथा-शब्द-अर्थ-अक्षरे वाकविण्याची किती तयारी आहे ह्याचे आणखी एकच उदाहरण घेऊन, आणि विचार-मंथ-नाला चालना देण्याचे कार्य लेखकाकडून घडल्या-बद्दल– त्याचे मनःपूर्वक आभार मानून हा परीक्षण-प्रपंच पुरा करतो.

लेखकाच्या ज्या प्रवृत्तीची 'नवीन नवीन अर्थ व्युत्पादून दाखवण्याचा व्यापक प्रयत्न' अशी भला-वण तर्कतीर्थांनी केली आहे, तिचे भरकटणारे विल-सित आपल्याला 'हतक' ह्या शब्दाच्या ओढा-ताणीत स्पष्ट दिसते. शरद् पाटील म्हणतात, "कटाहक जातकाचा नायक कटाहक हा एका व्यापाऱ्याचा दास होता. हा शब्द कट व अ-हन् या दोन शब्दांचा बनलेला असून कटाहचा अर्थ होतो कढई." (पृ. ३४३). आधीच्या परिच्छेदात कट म्हणजे 'देवस्थान जमीन' हा अर्थ सिद्ध केला आहे. त्यामुळे कटाहचा अर्थ कढई होतो ही माहिती कितीही मनोरंजक असली, तरी तिचा प्रस्तुत विषयाशी संबंध काय? बरं, पुढच्या विवेचनात ह्या कढईतून काही निष्पन्न होईल म्हणावं, तर तेही होत नाही. पाटील लगेच पुढे म्हणतात, 'हत वा हतक या हन् पासून बनलेल्या शब्दांना प्राचीन काळी एक विशेष अर्थ होता. भवभूतीच्या 'उत्तर–रामचरित' नाटकात (अंक १) राम स्वतःला उद्वेगाने 'राम-हतक' म्हणतो. विशाख-दत्ताच्या 'मुद्राराक्षस' नाटकात (अंक ३) श्रेष्ठी (व्यापारी) चंदनदास चाणक्याला तिटकाऱ्याने 'चाणक्य-हतक' असे म्हणतो. हतक म्हणजे नीच, दुष्ट माणूस, बहुधा दास.' (पृ. ३४३). पाटलांचा 'बहुधा दास' हा अर्थ हठादाकृष्ट आहे. मराठीत 'मेल्या', हिंदीत 'मुआ' आणि अन्य भारतीय भाषांतील एतदर्थक शब्द 'हतक'चे समानार्थक आहेत आणि त्यांचा अर्थ बहुधा दास होत नाही. त्यांचा संबंध 'हन्' चा एक अर्थ– 'ठार मारणे' – ह्याच्या-शीच फक्त जुळतो. तेथपासून तर मालवणी–कोक-णीतील अगदी निकटचा प्रेमसंबंध दाखविण्यापर्यंतची अर्थपरिवर्तनाची मजल उपर्युक्त कढईसारखी मनो-रंजक असली तरी येथे अप्रस्तुत! आपल्या पाचशे पानी ग्रंथाचा डोलारा ज्या शब्दावर उभा-रायचा त्याच्या आधारासाठी 'बहुधा दास'



अनुक्रमणिका

अर्थ असलेल्या शब्दांचा आणि संकल्पनांचा टेकू खरोखरीच उपयुक्त आहे काय, असा विचार पाटलांनी करायला हवा होता. बरं, चाननांची साक्ष पाटलांनी काढली आहे. तिच्यातून 'आहतक' शब्दाची व्युत्पत्ती बहुधा सिद्ध होते, 'हतक'ची नाही ! पाटील म्हणतात, "आहतक शब्दाचे विवरण चाननांनी पुढीलप्रमाणे केले– 'हा शब्द भतकआहतक या समासात आढळतो आणि त्याचा अर्थ होतो दास. तो हृ या धातूपासून बनला असून त्याचा अर्थ 'विकत घेतलेला' असा केला जाऊ शकतो. त्याचा संबंध आहितक या धा धातूपासून निघालेल्या संस्कृत शब्दाशी जोडला जाऊ शकतो आणि त्याचा अर्थ 'गहाण ठेवलेला' असा होऊ शकतो.' मुळात चाननांची संशोधनपद्धती अजब आहे. अमक्या शब्दाचा अमुक अर्थ केला जाऊ शकतो, त्याचा संबंध तमक्याशी जोडला जाऊ शकतो आणि हे सगळं केल्यावर त्याचा जो अर्थ होऊ शकतो तो पुन्हा मुळात घेतलेल्या अर्थापेक्षा वेगळाच ! संशोधकांनी इतक्या भुसभुशीत भूमीवर आपल्या उपपत्तींचे इमले उभारू नयेत. बरं, पाटलांनी ही साक्ष का काढली आहे तेही कळत नाही. त्यांना हतक शब्द व्युत्पादायचा होता. आहतक नव्हे. आणि 'उपसर्गेण धात्वर्थो बलादन्यत्र नीयते' हे त्यांना माहीत असणार. 'हृ' आणि 'धा' धातूंपासून व्युत्पादिलेल्या सोपसर्ग शब्दांचा उपयोग काय ? मग पाटील 'हतक', 'आहतक' हे दोन्ही शब्द सोडून 'भतक' कडे वळतात, त्याचाही 'अर्थ स्वतंत्र मोलमजूर असा नसून दास असावा' असा शेरा मारून मोकळे होतात. तिथून पुढे आपण 'चेट', 'चेटक'चा समाचार घेतो. मग देवदासी, सीता, कद्रू, सुपर्णा आपल्याला भेटतात वगैरे, वगैरे. हा प्रचंड हरदासी पाल्हाळ आपल्या सामान्य ज्ञानात चांगलीच भर घालीत असला, तरी विषयप्रतिपादनासाठी आणि सिद्धान्तप्रस्थापनासाठी त्याचा काहीही उपयोग होत नाही. नाना विषय अधांतरी लोंबकळत राहतात. पाटलांच्या ग्रंथातल्या विसंगती, कपोलकल्पित व्युत्पत्त्या, अतिशयोक्त्या, परस्परविरोध, घरसोडी, तर्कहीनता आणि अनावश्यक पाल्हाळ नुसता दाखवून द्यायचा तरी त्यांच्या ग्रंथाएवढाच ग्रंथ लिहावा लागेल, हे दुःखाने नमूद करावेसे वाटते.

स्वतःला लेबल काहीही लावले तरी त्याच्याशी प्रतिबद्धता (Commitment) मानली, की अनाग्रही सत्यशोधन बाजूला राहून पूर्वनिश्चित मतांचे येन केन प्रकारेण समर्थन खाली उरते. शरद् पाटलांचा ग्रंथ ह्या प्रकारचे उत्तम उदाहरण आहे.

०००





अनुक्रमणिका

डायनामाइट व नोबेल पारितोषिके या आल्फ्रेड नोबेल यांनी जगाला दिलेल्या देणग्या होत. दोन्ही सारखीच स्फोटक ठरली असून त्यांचा जगाच्या जडणघडणीवर प्रभाव पडला आहे. त्यांच्या सचिवा व १९०५ सालच्या शांततेच्या नोबेल पारितोषिक विजेत्या बेर्टा फोन झुटनर यांच्यामुळे त्यांना जागतिक शांततेच्या कार्यात रस वाटू लागला. शस्त्रनिर्मिती व जागतिक शांतता यांमध्ये समन्वय घडवून आणण्याचा त्यांचा प्रयत्न होता. डायनामाइट शोधण्यामागेही त्यांचा अंतिम हेतू शांतता हाच होता. कारण १८७६ साली ते म्हणाले होते, "सामूहिक विनाश घडवून आणतील अशी तंत्रे व तत्त्वे यांचा मी शोध घेत आहे. कारण त्यांच्या भयापोटी (का होईना) मानवजात युद्धाची भाषाच करू शकणार नाही." अर्थात त्यांचा हा आशावाद फोल ठरल्याचे दिसते आहेच.

---

# नोबेल पारितोषिके : १९८३

अशोक नारायण ठाकूर

---

नोबेल पारितोषिकासाठीची निवड हल्ली अठरा सदस्य असलेली एक समिती करीत असते. हे सदस्य कायम सदस्य असतात; म्हणजे मृत्यूशिवाय त्यांचे सदस्यत्व रद्द होत नाही. दरवर्षी शेकडो नावांची शिफारस समितीकडे करण्यात येते. त्यामुळे समितीचे कार्य अवघड होऊन बसते. उन्हाळी व हिवाळी सुटी वगळता समितीची बैठक दर गुरुवारी संध्याकाळी पाच वाजता भरते व तीत नावे निवडण्यावर चर्चा होते. या बैठकीला इतर कोणालाच हजर राहता येत नाही. मात्र राजे तिसरे गुस्ताव यांनी राजघराण्यातील व्यक्तींना या बैठकीस हजर राहण्याची परवानगी दिली आहे. असे असले, तरी या मंडळींना मतदानात भाग घेता येत नाही. कोणताही बुद्धिजीवी माणूस आंतरराष्ट्रीय प्रभावापासून मुक्त राहू शकत नाही, हा नियम या समितीच्या सदस्यांनाही लागू आहेच. म्हणूनच त्यांच्या निर्णयाविषयी उलटसुलट चर्चा होत राहते व राजकीय दबाव आल्याची तक्रार केली जाते. बरीस पास्तेरनाक (१९५८), म्यिखईल शॉलकॉव्ह (१९६५) व अलेक्सांद्र सोल्झेनित्सीन (१९७०) या अगदी भिन्न विचारांच्या लेखकांना साहित्याचे नोबेल पारितोषिक मिळालेले आहेत. याबाबतीत समितीकडे कोणताच खुलासा नाही किंवा तो करण्याची गरज तिला वाटत नाही. शिवाय समितीकडे नावाची शिफारस झाल्यावर बहुधा लगेचच पारितोषिक मिळते, असेही दिसत नाही. उदाहरणार्थ, विल्यम बटलर येट्स या कवीच्या नावाची शिफारस १९०४ साली करण्यात आली होती व त्यांना पारितोषिक मात्र १९२३ साली देण्यात आले, तर टॉमस मान यांचे पारितोषिकपात्र पुस्तक पारितोषिकाच्या घोषणेपूर्वी पन्नास वर्षे प्रसिद्ध झाले होते. या वर्षीच्या साहित्याच्या नोबेल पारितोषिकाविषयी पण असेच म्हणता येईल.

याशिवाय या वर्षीच्या नोबेल पारितोषिकांची काही वैशिष्ट्ये अशी आहेत : वैद्यकाचे व भौतिकीचे (चंद्रशेखर यांचे) पारितोषिक हे ३० व ५० वर्षांपूर्वी करण्यात आलेल्या संशोधनाला देण्यात आले आहे. या संशोधनावर त्या काळी केवळ टीकाच झाली नव्हती, तर त्याची हेटाळणी करण्यात आली होती आणि या उपहासात त्यांचे सहकारीही मागे नव्हते. अर्थात ही दोघे त्यांच्या काळाच्या इतकी पुढे होती की, अशी टीका होणे साहजिकच होते. आतापर्यंत नोबेल पारितोषिके मिळविणाऱ्या पति-पत्नी (उदाहरणार्थ, फ्रेदरिक व मारी क्युरी आणि त्यांची मुलगी व जावई) व पिता-पुत्र (उदाहरणार्थ, नील्स व ऑगे बोर) अशा जोड्या होत्या. आता त्यांत सी. व्ही. रमण व चंद्रशेखर या काका-पुतण्यांच्या जोडीची भर पडली आहे. एकट्या स्त्रीला वैद्यकाचे पारितोषिक प्रथमच मिळाले, तर वालेसा हे पहिले पोलीश पारितोषिकविजेते आहेत. नोबेल समितीच्या निवडीवर तिच्याच सदस्याने जाहीरपणे टीका याच वर्षी प्रथम केली; तर शांततेच्या पारितोषिकाचा निर्णय अध्यक्ष व सरचिटणीस यांनी नेहमीच्या प्रथेनुसार केवळ वाचून दाखविला नाही; तर त्यांनी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरेही दिली.





अनुक्रमणिका

## साहित्य

या वर्षीचे साहित्याचे परितोषिक ब्रिटिश कादंबरीकार, कवी व नाटककार विल्यम (जेरल्ड) गोल्डिंग यांना देण्यात आले. त्यांनी आपल्या साहित्यातून शाश्वत जीवनमूल्यांच्या आधारे मानवी जीवनाचे यथार्थ दर्शन घडविले असल्याने त्यांना हे पारितोषिक देण्यात आले आहे. स्विडिश ॲकॅडमीचे सचिव म्हणतात, " त्यांच्या लेखनशैलीत मिथ्यकथांचा आकृतिबंध आढळतो आणि त्यांच्या कादंबऱ्यांतील रंगतदार वर्णनांमध्ये जीवनवादी उत्साह, उत्तेजना व विनोद यांची रेलचेल आढळते." नोबेल समितीचा निर्णय विवाद्य ठरत नसे व त्याविरुद्ध मतप्रदर्शन न करण्याचा संकेतही रूढ होता. या वर्षी मात्र समितीचे एक सदस्य व कवी आर्टुर लुंड्क्व्हिस्ट्र यांनी निर्णयाविषयी जाहीर नापसंती व्यक्त केली. ते म्हणतात, " गोल्डिंग यांच्या साहित्यामध्ये ब्रिटनमधील लोकजीवनाचे आभासरूप दर्शन आढळते व त्यात खास दखल घ्यावी असे काहीही नाही. " अर्थात समितीने यावर काहीही प्रतिक्रिया व्यक्त केली नाही.

गोल्डिंग यांचा जन्म न्यूक्वे (कॉर्नवॉल ) येथे १९ सप्टेंबर १९११ रोजी झाला. त्यांचे शिक्षण मार्लबरो ग्रामर स्कूल व ऑक्सफर्ड येथे झाले. काही काळ त्यांनी शिक्षणक्षेत्रात काम केले. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात ते नाविक दलात होते. तेव्हाच त्यांना आपल्या कार्याची प्रेरणा मिळाली आणि ग्रीक भाषा व साहित्याचा अभ्यास करण्यास वेळही मिळाला. ग्रीकशिवाय त्यांना संगीत, पुरातत्त्वविद्या इत्यादींची आवड आहे. त्यांना अनेक सन्मान मिळाले असून त्यांत सन्माननीय पदव्या, पदके, पारितोषिके वगैरेंचा समावेश आहे. त्यांचा विवाह ॲन ब्रुकफील्ड यांच्याशी १९३९ साली झाला असून त्यांना एक मुलगा व एक मुलगी आहे.

गोल्डिंग यांच्या लेखनाला वयाच्या सातव्या वर्षीच सुरुवात झाली. अर्थात खऱ्या अर्थाने साहित्याकडे वळण्यापूर्वी ( १९३०-४० दरम्यानच्या काळात ) छोट्या छोट्या नाटक मंडळांतून लेखक, नट, निर्माता व कधीकधी दिग्दर्शक म्हणून त्यांनी काम केले होते. त्यांना प्राचीन ईजिप्तवर नाटक लिहायचे होते. मात्र त्यातील पात्रे इंग्रजीत बोलतील हे त्यांना प्रशस्त वाटले नाही. म्हणून त्यांनी ईजिप्शियन भाषेचा अभ्यासही केला होता. १९३४ साली त्यांनी कविता केल्या. त्यांमध्ये नंतरच्या त्यांच्या विचारांचे प्रतिबिंब पडलेले दिसते. त्यांना कोणत्याही मळलेल्या वाटेने जाणे मान्य नाही. त्यांनी कवितांशिवाय नाटके, निबंध, कादंबऱ्या व लघुकथाही लिहिल्या. परंतु कादंबऱ्यांमुळे त्यांना प्रसिद्धी लाभली. त्यांच्या प्रत्येक कादंबरीचा काळ, स्थळ, शैली व विषय अगदी भिन्न आहेत. तथापि मानवाचे अधःपतन हा विषय सर्वांत आढळतो. माणूस आपल्या स्वभावाविषयी असलेल्या अज्ञानातून दुःखी होत असतो, असे त्यांना वाटते. त्यांनी कादंबऱ्यांच्या आकृतिबंधाला निरूपणापेक्षा गौण स्थान दिले असले, तरी तोही विलक्षण आहे. जुन्या वळणाची रूपके, स्वतंत्र दृश्य-वर्णन, आश्चर्यकारक प्रतिमासृष्टी आणि मानवातील सुधारणेच्या पलीकडे असलेल्या पशूचे काळेकुट्ट चित्रण ही त्यांच्या लेखनाची वैशिष्टये होत.

' लॉर्ड ऑफ द फ्लाइज ' (१९५४) ही त्यांची सर्वांत जास्त गाजलेली कादंबरी आहे. हिच्यावर स्तुतिसुमने उधळली गेली व टीकेचे प्रहारही झाले आणि अजूनही तिच्यावर उलटसुलट चर्चा चालू आहेच. हिच्या अनेक आवृत्त्या निघाल्या, शाळा-महाविद्यालयांच्या अभ्यासक्रमात तिचा समावेश करण्यात आला आणि १९६३ साली पीटर ब्रुक यांनी तिच्यावर चित्रपटही काढला. मात्र ती २१ वेळा प्रकाशकांनी नाकारली होती. ( यासंबंधात गोल्डिंग हे टी. एस्. इलियट यांनाही भेटले होते. कारण इलियट हे फेबर-फेबर या प्रकाशनसंस्थेचे एक संचालक होते. तेव्हा इलियट त्यांना आयातुल्ला खोमेनीसारखे वाटले होते. अर्थात इलियट थोर गृहस्थ असल्याने त्यांनी रबराची झाडे व भूच्छत्रे यांविषयीच गोल्डिंग यांच्याशी चर्चा केली). या कादंबरीत पॅसिफिकमधील एका निर्जन, ओसाड बेटावर राहावे लागलेल्या शाळकरी मुलांचे त्या विशिष्ट वातावरणात रक्तपिपासू व रानटी स्वभावाच्या मुलांत कसे अधःपतन झाले व त्यामुळे समाजव्यवस्थेचा कसा ऱ्हास झाला, ते चित्रित केले आहे. यातून त्यांना मनुष्य मुळात क्रूर असल्याचे दाखवून

अनुक्रमणिका

## नोबेलविषयी थोडेसे !

नोबेल बालपणी पुष्कळ वेळा आजारीच असत. त्यामुळे ते खेळाला मुकले व एकांतप्रिय बनले. मोठेपणीही ते स्वतःला प्रयोगशाळेत कोंडून घेत. पुढील आयुष्यात धंद्याचा व्याप वाढला व त्यामुळे प्रवासही वाढला. मात्र प्रवासासाठी ते आगगाडीचा स्वतंत्र डबा पसंत करीत. या डब्याला ते 'फिरता तुरुंग' म्हणत. सोफी नावाच्या ऑस्ट्रियन तरुणीवर त्यांचे प्रेम होते; पण तिचे त्यांच्या संपत्तीवर ! तिला संपत्ती मिळालीही; परंतु नोबेल यांच्या वाट्याला आले मृगजळ – पाण्यासाठी खुणावणारी तप्त वाळू !

नोबेल स्वतः कविता करीत व इतरांच्या कवितांचे अनुवादही करीत. १८९६ साली त्यांनी 'नेमेसिस' नावाचे नाटक लिहिले होते. मात्र त्यांच्या घरच्यांना हे नाटक हा त्यांच्या जीवनावरील कलंक ठरेल असे वाटले. त्यामुळे त्यांनी नाटकाच्या फक्त ३ प्रती ठेवून इतर नष्ट केल्या. व्हिक्टर ह्यूगो, मोपांसा, बोल्झॅक यांसारखे आदर्शवादी लेखक त्यांना आवडत असत आणि प्रकृतिवादी व आधुनिकतावादी लेखकांविषयी त्यांना प्रेम नसे. अर्थात यावरून त्यांच्या साहित्याविषयीच्या मतांबद्दल काही तर्क करता येणे शक्य नाही. कारण त्या वेळच्या बहुतेक उच्चकुलीन लोकांची आवड-नावड अशीच होती. तथापि त्यांच्या मृत्युपत्रातील साहित्याच्या पारितोषिकाविषयीचे पुढील वाक्य अर्थपूर्ण म्हणता येईल, "आदर्शवादी प्रवृत्तीच्या सर्वांत असामान्य लेखनाला हे पारितोषिक देण्यात यावे."

लूटव्हिख या आपल्या भावाच्या आग्रहाखातर त्यांनी आपल्याबद्दलची त्रोटक माहिती लिहून ठेवली; ती अशी :

मी आत्मचरित्र लिहिणे शक्यच नाही; मात्र जर ते पोलिसांच्या अहवालासारखे त्रोटकपणे द्यायचे असेल, तर गोष्ट वेगळी. उदाहरणार्थ, ते पुढील प्रकारचे असेल –

आल्फ्रेड नोबेल : एक दयनीय अपूर्ण जीव. तो जेव्हा रडत या जगात आला, तेव्हाच डॉक्टरांनी त्याला नष्ट करायला हवे होते.

गुण : स्वतःची नखे स्वच्छ ठेवतो; कधीही कोणाला भारभूत झाला नाही.

अवगुण : स्वतःचा परिवार नाही; नेहमी खुशीत असतो व जबरदस्त भूक लागते.

एकमात्र इच्छा : जिवंत गाडले न जाण्याची.

एकमेव पाप : 'मॅमन'ची पूजा करीत नाही.

जीवनातील महत्त्वाच्या घटना : एकही नाही. एवढे पुरेसे नाही का ?

आमच्या शतकातील अशी कोणती घटना आहे की, जिला महत्त्वपूर्ण म्हणता येईल ? या छोट्याशा बुडबुड्यात – ज्याला आकाशगंगा म्हणतात– कोट्यवधी किंवा अब्जावधी सूर्य आहेत. खरे तर त्यांनाही महत्त्व नाही. या सर्व सृष्टीच्या तुलनेतील आपल्या तुच्छतेमुळे त्यांना स्वतःचीच शरम वाटत असेल ........ केवळ सिनेमातील कलाकार व खुनी यांच्याविषयीचे लेखनच लोक वाचतात... विशेष करून खुन्यांविषयीचे– मग त्यांनी आपली कृत्ये घरात केलेली असोत किंवा युद्धभूमीवर. त्यांची ही कृष्णकृत्ये अशी आहेत की, ती पाहून मानवजातीने तोंडात बोट घालावे !

अनुक्रमणिका








द्यायचे आहे. मानवी स्वभावातील दोषांमध्येच समाजाच्या दोषांचा शोध घेण्याचा हा प्रयत्न असल्याचे त्यांना वाटते.

'पिंचर मार्टिन' (१९५६) ही कादंबरी काहींना त्यांची सर्वोत्कृष्ट कलाकृती वाटते. 'द इन हेरिटर्स' (१९५७) या कादंबरीत होमो सेपिएन्स या मानवजातीने निरागस अशा निअँडरथल मानवांचा केलेला पराभव वर्णिला आहे. पहिले खरे मानव (होमो सेपिएन्स) हे खरे दुष्ट मानव असल्याचे व ही दुष्टता नंतरच्या काळात वाढतच गेल्याचे त्यांना यातून दाखवायचे आहे. 'फ्री फॉल' (१९५९) ही काहीशी आत्मचरित्रपर कादंबरी असून तीत त्यांनी आपल्या शांततेच्या व युद्धाच्या काळातील जीवनाचा मागोवा घेण्याचा प्रयत्न केला आहे. विशेषतः मुक्त बालपणातील निरागस पापांपासून ते बंधने पडलेल्या प्रौढपणातील खऱ्या पापांपर्यंतचे संक्रमण कसे झाले, ते यात दाखविले आहे. याशिवाय त्यांच्या 'ब्रास बटरफ्लाय' (९५८, नाटक), 'द स्पायर' (१९६४), 'द हॉट गेट्स अँड अदर ऑकेजनल पीसेस' (१९६५), 'द पिरॅमिड' (१९६७), 'द स्कॉर्पियन गॉड' (१९७१), 'डार्कनेस व्हिजिबल' (१९७९), 'राइट्स ऑफ पॅसेज' (१९८०) इत्यादी कलाकृती प्रसिद्ध झाल्या आहेत.

नोबेल पारितोषिकाच्या बातमीच्या खरेपणाविषयीच त्यांना प्रथम शंका आली होती मात्र बातमी खरीच असल्याचे समजल्यावर त्यांनी घोड्यावरून रपेट मारून आनंद साजरा केला. ते म्हणाले, " मी आनंदाने भारावून गेलो आहे. हे पारितोषिक मिळावे असे स्वप्न प्रत्येक लेखकच पाहत असतो; पण ती खरी तर केवळ आत्यंतिक सदिच्छाच असते. मात्र आत्मपरीक्षण करणाऱ्या विवेकी माणसाला असे स्वप्न पाहणे ही अविचारी कृती वाटते. मला झालेल्या आनंदाला अनेक विशेषणे लावता येतील खरी; परंतु त्यामुळे माझ्या नेमक्या भावना व्यक्त होतील, असे वाटत नाही."

## शांतता

यंदाचे शांततेचे नोबेल पारितोषिक पोलंडमधील कामगार नेते लेक वालेसा यांना देण्यात आले आहे. व्यक्तिशः मोठा त्याग करून कामगारांना आपली स्वतःची संघटना स्थापण्याचा हक्क मिळवून देण्यासाठी त्यांनी केलेल्या प्रयत्नांबद्दल हे पारितोषिक त्यांना देण्यात आले. संघटनेचा हक्क हा मानवी हक्क असल्याचे यूनोचे मत आहे. नोबेल समिती मानवी हक्कासाठीचे प्रयत्न हे शांततेचे प्रयत्न मानते; कारण त्यामुळे आंतरराष्ट्रीय तणाव कमी होतात. वालेसा शांततेचे व स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते आहेतच; शिवाय हिंसाचाराला उत्तेजन न देता देशाचे प्रश्न वाटाघाटींतून व सहकार्याच्या भावनेद्वारे सोडविण्याचा त्यांचा निर्धार समितीला उल्लेखनीय वाटला. प. जर्मनी, फ्रान्स, नॉर्वे इत्यादी देशांतील संसदीय गटांनी त्यांच्या नावाची शिफारस केली होती; तर फिलीप हबीब (मध्य पूर्वेतील अमेरिकेचे शांतिदूत), एली वीझेल (अमेरिकन ज्यू लेखक) वगैरे या स्पर्धेत होते.

वालेसा यांचा जन्म पोलंडमधील पॉपॉव्हो या गावी २९ सप्टेंबर १९४३ रोजी झाला. प्राथमिक व तांत्रिक शिक्षण झाल्यावर ते गदान्स्क येथील गोदीत इलेक्ट्रिशियन म्हणून लागले (१९६६) व सध्या तेथेच आहेत. या गोदीत १९७० साली झालेल्या संपाच्या वेळी ते संप-समितीचे चेअरमन होते. नंतर १९७६–८० या काळात ते बेकार होते व परत त्याच गोदीत दाखल झाले. १९८० साली ऑगस्ट–सप्टेंबरमध्ये झालेल्या संपात ते विविध संस्थांमधील समित्यांचे चेअरमन होते. यातूनच साम्यवादी देशामध्ये कामगारांची स्वतंत्र अशी पहिली अशासकीय संघटना (सॉलिडॅरिटी) स्थापन झाली व तीमुळे कामगारांना संपाचा हक्क प्राप्त झाला. या संघटनेचा व वालेसा यांचा जनतेवर शासनापेक्षा अधिक प्रभाव असल्याने ते शासनाशी संवाद साधू शकले. मात्र १९८१ साली या संघटनेवर बंदी घालण्यात आली व वालेसा यांना ११ महिने कारावास भोगावा लागला.

बातमी आली तेव्हा ते अळंबी गोळा करण्यासाठी जंगलात गेले होते. त्यांच्या पत्नीला बातमी ऐकून खूप आनंद झाला (ती व त्यांचा थोरला मुलगा यांनी नंतर पारितोषिक स्वीकारले). सॉलिडॅरिटीच्या एका नेत्याच्या मते पारितोषिकामुळे वालेसा ही पोलंडमधील मोठी नैतिक शक्ती असल्याचे मान्य झाले; तसेच संघटनेचा विश्वास व

प्रतिष्ठाही यामुळे वाढली. मात्र तेथील शासनाने पारितोषिकामागे राजकीय हेतू असल्याची टीका केली व यामुळे नोबेल पारितोषिकाचेच अवमूल्यन झाल्याचे म्हटले आहे.

हजारो कामगारांपुढे आवेशाने तासन्तास बोलणारा हा नेता अभिनंदनार्थ आलेल्या लोकांपुढे अडखळत–अडखळतच बोलू शकला व तेही थोडेसेच. " हे आपणा सर्वांचे पारितोषिक असून सॉलिडॅरिटीचे आदर्श व प्रयत्न यांना यामुळे जगभर मान्यता मिळाली आहे. संघटितपणे पण शांततेने काम करणे हे नेहमीच अधिक सोपे काम असते. मला नोबेल समितीने समजून घेतले. शांततेच्या मार्गाव्यतिरिक्त इतर मार्ग मला मान्य नाहीत. हा मार्ग अधिक लांबचा आहे, हे खरे; मात्र तो मार्गच अधिक यशस्वी मार्ग आहे ", असे ते म्हणतात. शांततेनेच विजय मिळेल, असा त्यांचा ठाम विश्वास असून एकविसावे शतक हे शांततामय संघर्षाचे असेल असे त्यांना वाटते.

खाजगी शेतीला मदत करण्यासाठी कॅथलिक चर्च २० लाख डॉलर्सचा एक निधी उभारणार असून त्याची व्यवस्था चर्च व शासन पाहणार आहेत. नोबेल पारितोषिकापोटी मिळणारे पैसे वालेसा या निधीला देणार आहेत.

## अर्थशास्त्र

अर्थशास्त्रीय अध्ययनामध्ये, नवीन वैश्लेषिक पद्धतींचा समावेश ( वापर ) केल्याबद्दल, तसेच व्यापक ( विशेषतः बाजारपेठांतील ) समतोलाविषयीच्या सिद्धांताची सूत्ररूपात काळजीपूर्वक फेरमांडणी केल्याबद्दल प्रा. गेरार्ड डेब्रू (कॅलिफोर्निया विद्यापीठ, बर्कले ) यांना या वर्षीचे अर्थशास्त्राचे नोबेल-स्मृती पारितोषिक देण्यात आले आहे. रॉयल स्विडिश अ‍ॅकॅडेमी ऑफ सायन्सेसचे चेअरमन लिंडबेक म्हणाले की, डेब्रू यांनी नवीन गणितीय पद्धती शोधून काढल्या असून त्या अधिक प्रगत असल्या, तरीही आधीच्या पद्धतींपेक्षा अधिक सुलभ आहेत. आतापर्यंत २१ जणांना हे पारितोषिक मिळाले असून डेब्रू हे यांतील १२ वे अमेरिकन गृहस्थ आहेत.

डेब्रू यांचा जन्म फ्रान्समधील कॅलैस येथे ४ जुलै १९२१ रोजी झाला. १९५६ साली त्यांनी पॅरिस विद्यापीठाची पदवी संपादन केली. १९६२ झाली ते कॅलिफोर्निया विद्यापीठात अर्थशास्त्राचे प्राध्यापक झाले व १९७५ सालापासून ते तेथेच गणिताचे प्राध्यापक म्हणून आहेत. पारितोषिकाची बातमी प्रथम त्यांना चेष्टाच वाटली. मात्र खात्री पटल्यावर त्यांना अतिशय आनंद झाला. कारण हा सर्वांत मोठा बहुमान तर आहेच; शिवाय यामुळे संशोधनकार्याला मान्यता मिळाली, असे त्यांना वाटते.

बाजारपेठेतील व्यापक ( सर्वसाधारण ) समतोलाविषयीचा ( स्थैर्याविषयीचा ) सिद्धांत हे अर्थशास्त्रातील एक सर्वांत महत्त्वाचे क्षेत्र आहे. विकेंद्रित बाजारपेठेच्या पद्धतीत ग्राहक व संस्था यांचे वस्तू व सेवा यांच्या खरेदीविक्रीचे व्यक्तिगत पातळीवर घेण्यात येणारे निर्णय हे पूर्णपणे स्वहित लक्षात ठेवून घेतलेले असतात. वरवर पाहता स्वतंत्रपणे घेतलेले हे निर्णय कशा प्रकारे एकमेकांशी निगडित असतात व यातून उद्भवणाऱ्या परिस्थितीमधून विक्रेते आपल्या योजनाबद्ध उत्पादनाला कोणत्या प्रकाराने बाजारपेठ मिळवून देतात आणि ग्राहक आपला नियोजित खर्च कशाप्रकारे निश्चित करतात, असा प्रश्न अ‍ॅडम स्मिथ यांनी विचारला होता. त्यांनी त्याचे पुढील उत्तरही सुचविले होते : किंमतीत व वेतनात लवचिकता असली, तर किंमत-यंत्रणेद्वारे व्यक्तिगत पातळीवरील योजनांमध्ये अपेक्षित असलेली एकसूत्रता (समन्वय) आपोआप येते (म्हणजे व्यापक समतोलाच्या विश्लेषणात अर्थव्यवस्थेचा अंतर्गत समतोल गृहीत धरलेला आहे ).

एकोणिसाव्या शतकाच्या शेवटी ले ऑ वालरस यांनी हीच कल्पना गणितीय संज्ञांचा वापर करून सूत्रबद्ध केली. वस्तू व सेवा यांची ग्राहकांकडून होणारी मागणी, याच वस्तूंचा उत्पादकाकडून होणारा पुरवठा व सेवा, उत्पादकाची उत्पादन-घटकांची मागणी, तसेच मागणी व पुरवठा यांतील समानता ( उदाहरणार्थ, प्रत्येक बाजारपेठेतील समतोल) या बाबी दर्शविणारी समीकरणांची एक मालिकाच वालरस यांनी तयार केली. अशा प्रकारे मुक्त बाजारपेठेत किंमती, मागणी व पुरवठा यांची प्रवृत्ती समतोलावस्थेत जाण्याची असते, ही स्मिथ यांची व्यापक समतोलाची कल्पना वालरस यांनी







अनुक्रमणिका

सूत्रबद्ध केली. तथापि नंतर दीर्घकालपर्यंत या समीकरणांची अर्थशास्त्रीय योग्यता पडताळून पाहण्यात आली नाही. म्हणजे बाजारपेठेची यंत्रणा समजून घेण्याच्या दृष्टीने महत्त्वाची असलेली ही पद्धती तर्कशुद्ध व सुसंगत आहे की नाही, हे तपासून पाहण्याचे प्रयत्न झाले नाहीत.

हे काम केनेथ जोसेफ ॲरो (१९७२ चे नोबेल पारितोषिक विजेते) व डेब्रू यांनी १९५०-६० या काळात केले. याकरिता त्यांनी बाजारपेठेच्या अर्थव्यवस्थेविषयीची एक गणितीय नमुनाकृती मांडली. कुटुंब किंवा व्यक्ती व संस्था यांनी स्वतंत्रपणे घेतलेले निर्णय ज्या परिस्थितीत एकमेकांशी सुसंगत असतात, तिला या नमुनाकृतीत अर्थव्यवस्थेचा समतोल मानण्यात आले आहे. म्हणजे विविध उत्पादकांनी वस्तूंचे उत्पादन व उत्पादक घटकांची मागणी यांचे नियोजन त्यांना कमाल नफा मिळावा अशा प्रकारे केलेले असते. यामुळे या नमुनाकृतीमध्ये एकीकडे वस्तूंचा पुरवठा व उत्पादक घटकांची मागणी आणि दुसऱ्या बाजूला सर्व प्रकारच्या किंमती यांच्यांत परस्परसंबंध निर्माण होतात. ग्राहक कसा वागेल याविषयी काही गोष्टी गृहीत धरून त्यांनी मागणी फलने किंवा 'जुळणारे संबंध' (उदाहरणार्थ, किंमती आणि मागणी व पुरवठा केलेल्या वस्तू यांच्यांतील संबंध) प्रस्थापित करू शकले. अशा तऱ्हेने समतोल निर्मिणाऱ्या किंमतीचे अस्तित्व ते सिद्ध करू शकले व स्मिथ व वालरस यांच्या कल्पना सुसंगत असल्याचे त्यांनी दाखवून दिले. या आधीच्या प्रयत्नानंतर अशा सिद्धांताचा पुष्कळच विस्तार व विकास झाला आहे व त्यामध्ये डेब्रू यांचा वाटा मोठा आहे. 'थिअरी ऑफ व्हॅल्यू' (१९५५) या त्यांच्या पुस्तकातील सिद्धांत अनेक बाबतीत उपयुक्त ठरला आहे.

बाजारपेठेच्या अर्थव्यवस्थेविषयीच्या कल्पनेचा संबंध समतोलाच्या स्थिरतेशीही येतो. यातून पुढील प्रश्न निर्माण होतो : आपली आर्थिक स्थिती निश्चितपणे सुधारण्यासाठी दलालांच्या एखाद्या गटाला बाजारपेठेतून पूर्णतया बाहेर पडणे फायदेशीर ठरू शकेल का ? दलालांची संख्या खूप जास्त असलेल्या बाजारपेठेतील आपला व्यापार थांबविणे कोणत्याही गटाला फायदेशीर ठरणार नाही, असे डेब्रू यांनी दाखवून दिले आहे. म्हणजे या बाबतीत बाजारपेठेचा समतोल टिकून राहील.

ग्राहकाच्या वर्तणुकीविषयीच्या सिद्धांतातही त्यांनी मोलाची भर घातली आहे. ग्राहकाचे वस्तूंच्या बाबतीतील अग्रक्रम किंवा पसंतीचा क्रम दर्शविण्यासाठी त्यांनी उपयुक्तताफलने वापरली आहेत.

बाजारपेठेतील साधनसंपत्तीच्या वाटणीची प्रमाण वा आदर्श वैशिष्ट्ये ही बाजारपेठेच्या अर्थव्यवस्थेशी निगडित असलेली आवश्यक बाब आहे. बाजारपेठेच्या यंत्रणेमध्ये असणाऱ्या 'अदृश्य हाता'द्वारे होणाऱ्या स्वहिताच्या पूर्तीमधून समाजातील अपुऱ्या साधनसंपत्तीचा न्यायाने वा कार्यक्षमतेने वापर होईल का ? एकाची स्थिती सुधारण्याचे प्रयत्न म्हणजेच इतर व्यक्तींकडून काहीतरी काढून घेणे अशी परिस्थिती (उदाहरणार्थ, कोणत्याही प्रकारची उघळपट्टी नसलेली स्थिती) निर्माण करण्याच्या दृष्टीने साधनसंपत्तीच्या वापरात व उत्पादनाच्या पद्धतीत बदल करता येईल का ? विशिष्ट परिस्थितीमध्ये बाजारपेठेतील मूल्यनिर्धारणात असे समर्थ गुण असतात, हे दीर्घकाळापासून माहीत आहे. परंतु असे गुण हमखासपणे येण्यासाठी ज्या अटींची पूर्ती करावी लागते त्यांचे नेमके स्वरूप व एकूण व्याप्ती अद्यापि ठरविता आलेली नाहीत. डेब्रू यांच्या व त्यांच्यानंतरच्या संशोधनामधून या अटी उघड झाल्या असून त्यांचे तपशीलवार विश्लेषण करण्यात आले आहे.

मात्र डेब्रू यांचे सर्वांत मोठे कार्य हे अप्रत्यक्ष स्वरूपाचे आहे. स्पष्टता व सुलभता, विश्लेषणातील नेमकेपणा, तसेच सिद्धांत आणि त्याचे स्पष्टीकरण यांच्यांतील भेद स्पष्ट करण्याचा आग्रह या त्यांच्या गुणांचा अर्थशास्त्रीय अध्ययनावर (उदाहरणार्थ; पद्धतीची व वैश्लेषिक तंत्राची निवड) खोलवर व आगळा परिणाम झाला आहे.

## वैद्यक अथवा शरीरक्रियाविज्ञान

आपली जागा बदलणाऱ्या आनुवंशिक घटकांचा शोध सुमारे तीस वर्षांपूर्वी बार्बारा मॅक्लिन्टॉक यांनी लावला होता व त्याबद्दल त्यांना या वर्षीचे वैद्यकाचे नोबेल पारितोषिक देण्यात आले. आनुवंशिक गुणधर्म एका पिढीतून पुढील पिढीत नेणाऱ्या जनुकांचे (जीनांचे) कार्य व संघटन समजून घेण्याच्या दृष्टीने हा शोध अतिशय महत्त्वाचा ठरला आहे.

या शतकातील आनुवंशिकीच्या दोन महान शोधां पैकी हा एक आहे, असे नोबेल समितीला वाटते. (डीएनए म्हणजे डीऑक्सिरिबोन्युक्लिइक अम्लाची रचना द्वीसर्पिल प्रकारची असल्याचा शोध वॉटसन व क्रीक यांनी लावला असून तो दुसरा महान शोध होय ).

बार्बारा मॅक्लिन्टॉ यांचा जन्म हार्टफोर्ड (कनेक्टिकट, अमेरिका ) येथे १६ जून १९०२ रोजी झाला. त्यांचे शिक्षण ब्रुकलीन, न्यूयॉर्क व कॉर्नेल विद्यापीठांत झाले. १९१९ साली कॉर्नेल विद्यापीठात गेल्यावर त्यांना वनस्पतिप्रजनन हा विषय घ्यायचा होता; परंतु या विषयाला स्त्रिया लायक समजल्या जात नसल्याने त्यांना वनस्पतिविज्ञानाचे अध्ययन करावे लागले. मात्र त्यांनी आपली पीएच्. डी. ची पदवी वनस्पति-आनुवंशिकी या विषयातच मिळविली ( १९२७ ). त्या काळात स्त्रियांना योग्य अशी थोडीच पदे होती व त्यामुळे त्यांनी अनेक नोकऱ्या केल्या व एका वर्षी तर त्यांना बेकार राहावे लागले. १९४० साली त्यांची नॅशनल ॲकॅडेमी ऑफ सायन्सेसवर निवड झाली, तेव्हा त्या अशा तिसऱ्याच महिला होत्या. शेवटी त्या कार्नेगी इन्स्टिटयूशनच्या कोल्डस्प्रिंग हार्बर येथील जीवविज्ञानाच्या संशोधन प्रयोगशाळेत दाखल झाल्या व अजूनही त्या तेथेच कार्यरत आहेत. तेव्हापासून मक्याच्या शेताचा छोटा तुकडा हेच त्यांचे कार्यक्षेत्र राहिले आहे. ज्या काळात बहुतेक बडे शास्त्रज्ञ चकचकीत अशा प्रयोगशाळांमधून साहाय्यकांच्या गराड्यात सांघिक संशोधन करीत आहेत; त्या काळात मॅक्लिन्टॉक या एकट्याच आपल्या आवडत्या शेतात कार्यमग्न असतात. त्यांनी आतापर्यंत जे शोधनिबंध लिहिले आहेत; त्यांपैकी एक वगळता सर्व निबंध एकटीनेच लिहिलेले आहेत. त्यांची राहाणीही साधी असून घरी फोन नसल्याने पारितोषिकाची बातमी त्यांना आकाशवाणीद्वारे समजली.

आनुवंशिकताविज्ञानाचे जनक ग्रेगॉर मेंडेल व मॅक्लिन्टॉक यांच्या परिस्थितीत काही साम्ये आढळतात. मेंडेल यांचे संशोधन ५० वर्षे तर यांचे ३० वर्षे अज्ञातवासात राहिले. मेंडेल यांनी वाटाण्याच्या तर यांनी मक्याच्या शेतात आपले आयुष्यभरचे कार्य एखाद्या व्रतस्थ मुनीप्रमाणे केले. आणि बहुतेक आयुष्यभर दोघांच्या कार्याकडे दुर्लक्ष झाले. म्हणून मॅक्लिन्टॉक यांना 'आधुनिक मेंडेल' म्हणता येईल.

अर्थात मॅक्लिन्टॉक यांना अनेक संस्थांचे सदस्यत्व, अनेक विद्यापीठांच्या सन्माननीय पदव्या, अनेक प्रकारची पारितोषिके, पदके इत्यादी सन्मान लाभले आहेत. त्यांनी रॉकफेलर फाउंडेशनच्या शेतीविषयक कार्यक्रमाच्या सल्लागार म्हणूनही काम केले आहे (१९६२-६९). मॅकआर्थर फाउंडेशनची वर्षाला ६०,००० डॉलर्सची करमुक्त शिष्यवृत्ती मिळाल्यावर ( १९८१ ) त्या म्हणाल्या होत्या, "मला कोणत्याही गोष्टींचा संग्रह करणे आवडत नाही." नोबेल पारितोषिकाच्या पैशांचे काय करणार असे विचारल्यावर त्या उद्गारल्या, "किती पैसे मिळतील तेही मला माहीत नाही." नोबेल पारितोषिक मिळाल्यावर त्यांची प्रतिक्रिया अशी होती : "विशिष्ट प्रश्न सोडविण्याचे काम मी मक्याच्या झुडुपांवर सोपविले व त्यांचा प्रतिसाद पाहून मी अनेक वर्षे आनंद उपभोगला. (मात्र) पारितोषिक केवळ हा आनंद उपभोगणाऱ्या व्यक्तीलाच मिळाले; हे थोडेसे अयोग्य वाटत नाही का ? मी जर हे संशोधन इतरत्र केले असते, तर त्याकरिता मला निश्चितच बोलणी खावी लागली असती; कारण ते कोणालाच मान्य होत नव्हते ना !"

आपल्या संशोधनासाठी त्यांनी मका (झिया मेझ; इंडियन कॉर्न ) ही वनस्पती निवडली होती. कारण या मक्याचे दाणे निरनिराळ्या रंगांचे असतात व प्रत्येक रंग हा विशिष्ट जनुकामुळे आलेला असतो (असे मानीत). मात्र पिढ्यान् पिढ्या मक्याचे निरीक्षण केल्यावर अपेक्षिल्याप्रमाणे दाण्याच्या रंगात बदल होत नाही, असे त्यांना आढळून आले. यांपैकी काही जनुके रंगसूत्रावरील आपली जागा हवी तशी बदलत असल्याचे व त्यामुळे दाण्याच्या रंगात अपेक्षेहून वेगळे बदल होत असल्याचे त्यांना दिसून आले. अशा प्रकारे त्यांनी चलनक्षम आनुवंशिक घटकांचा शोध लावला व त्यांनाच 'उड्या मारणारी जनुके' असे उपहासगर्भ नाव देण्यात आले.

मक्यातील अशा उत्परिवर्तनशील जनुकाचा पूर्ण गटच त्यांनी शोधून काढला. काही दाण्यांचा रंग उलट दिशेने बदलल्याचे म्हणजे जंगली प्रकारातील






दाण्यासारखा झाल्याचे त्यांच्या लक्षात आले. म्हणून त्यांनी रंगद्रव्याच्या जनुकांशिवाय दोन जनुके (आनुवंशिक चलनक्षम घटक) गृहीत धरली. पैकी एक रंगद्रव्याच्या जनुकाच्या अगदी नजीक असून ते रंगद्रव्याच्या जनुकाचे कार्य सुरू वा बंद करू शकते; तर दुसरे त्याच्यापासून अधिक दूर असून ते पहिल्याच्या बंद–चालू करण्याच्या क्रियेची त्वरा नियंत्रित करते. वेगळी ओळखू यावीत म्हणून यांना त्यांनी नियामक घटक म्हटले. हे घटक एका पिढीतून पुढील पिढीत जाताना रंगसूत्रावरील आपली जागा बदलतात, असे त्यांना आढळले. परिणामी त्यांच्या नियंत्रणाखाली अन्य जनुके येतात. अशाप्रकारे आता प्रथिनाची निर्मिती करणारी व या प्रथिननिर्मितीचे नियंत्रण करणारी जनुके गृहीत धरली जातात.

तथापि हा शोध लागला त्या वेळी जननिक संकेत व डीएनए ची द्वीसर्पिल रचना ही कोडी उलगडलेली नव्हती. त्यामुळे हा शोध त्या काळाच्या इतका पुढे होता की, त्या वेळच्या फक्त पाच जणांनाच त्याची योग्यता समजू शकली, असे नोबेल समितीचे मत आहे. पेशीचे भौतिकीय गुणधर्म व कार्ये यांवर नियंत्रण ठेवणारी जनुके ही गुणसूत्रावर माळेतील मोत्याप्रमाणे स्थिर असतात असे मानले जात होते, त्या काळात मॅक्लिन्टॉक यांनी जनुके आपल्या जागा यदृच्छया बदलतात ( म्हणजे जनुकांची स्थाने स्थिर असली, तरी त्यातील नियामक घटक जागा बदलतात), असे विरुद्ध मत मांडले. शिवाय त्याचा पुरावाही झटकन पुढे मांडला. मात्र तो समजण्याला अवघड होता म्हणून त्याकडे दुर्लक्ष झाले व त्या एकट्या पडल्या. परिणामी टीका व उपहास यांनाही त्यांना तोंड द्यावे लागले. त्या म्हणतात, "त्यांना तेव्हा मी मूर्ख व ठार वेडी आहे, असेच वाटले. मात्र माझा पुरावा बिनतोड होता कारण लागवड, परागण व निरीक्षण यांत मी अनेक वर्षे घालविली होती व त्यातूनच दाण्यांचा रंग अपेक्षेनुसार बदलत नसल्याचे समजून आले होते."

मात्र गेल्या दहा वर्षांत त्यांच्या या शोधाचे जीवविज्ञानातील व वैद्यकशास्त्रातील महत्त्व लक्षात आले आहे. बॅक्टिरियांमध्ये प्रतिजैव पदार्थांना विरोध करण्याची क्षमता येण्यासाठी त्यांना जागा बदलणाऱ्या आनुवंशिक घटकांचा उपयोग होतो व हा गुण ते याच घटकांद्वारे शेजारच्या बॅक्टिरियाकडे संक्रामित करतात, असे हल्ली मानले जाते. संसर्गजन्य रोगावर उपचार करताना जे प्रश्न निर्माण होतात, ते समजावून घेण्याकरिता या घटकांची मदत होते. जीवांतील आनुवंशिक लक्षणे एकातून दुसऱ्यात कशी संक्रामित होतात, हे स्पष्ट करण्यासाठी त्यांचा उपयोग होतो. आफ्रिकन निद्रारोगास कारणीभूत असणाऱ्या परोपजीवीत यांच्यामुळे बदल होतो व म्हणून तो प्रतिजीवी रोग्याच्या रोगप्रतिकारक्षमतेवर मात करू शकतो एका गुणसूत्रातून दुसऱ्यामध्ये कर्क-जनुके गेल्याने साध्या पेशीचे कर्क-पेशीत (गाठीत) रूपांतर होत असावे. तसेच उत्क्रांतीच्या प्रक्रियेच्या प्रसारातही या घटकांचा सहभाग असावा, असे अनुमान आहे.

आपल्या कल्पना कोणालाच पटत नव्हत्या म्हणून आपले संशोधन व त्यातील निष्कर्ष प्रसिद्धच करू नयेत, असे त्यांनी जवळजवळ ठरविले होते. कारण जर कोणीच वाचणार नसेल, तर ते छापून तरी काय उपयोग? परंतु १९६०–७० या दशकात रेणवीय जीवविज्ञानातील प्रगत अत्याधुनिक तंत्रांमुळे त्यांचे म्हणणे खरे असल्याचे आढळून येऊ लागले. मात्र यावरील त्यांची प्रतिक्रिया कडवट नव्हती किंवा त्यांना या गोष्टीचे आश्चर्यही वाटले नाही. त्या म्हणतात, "आपण बरोबर असल्याची जाणीव असते, तेव्हा इतरांच्या म्हणण्याची फिकीर करण्याची गरज नसते. (कारण) आज ना उद्या यातून बाहेर पडण्याची खात्री असते."

## रसायनशास्त्र

यंदाचे रसायनशास्त्राचे नोबेल पारितोषिक हेन्री टाउबे या स्टॅनफर्ड विद्यापीठातील अकार्बनी रसायनशास्त्राच्या प्राध्यापकांना मिळाले आहे. विशेषत: धातूंच्या जटिलामधील ( धातवीय आयनांच्या म्हणजे विद्युत् भारित अणूंच्या जटिल संयुगामधील ) इलेक्ट्रॉनांच्या स्थानांतरणविषयक ( देवाण-घेवाण वा आदलाबदल होण्याच्या ) विक्रियांच्या यंत्रणांविषयी केलेल्या संशोधनाबद्दल हे पारितोषिक त्यांना देण्यात आले आहे. स्विडिश ॲकॅडेमी ऑफ सायन्सेस त्यांच्याविषयी म्हणते की, अकार्बनी रसायनशास्त्रातील हल्लीचे एक सर्वाधिक



अनुक्रमणिका







सर्जनशील शास्त्रज्ञ असून संशोधनातील अनेक क्षेत्रांमध्ये ते आघाडीवर आहेत. गेल्या तीस वर्षांतील या विषयाच्या कार्यावर त्यांचा निश्चितच प्रभाव पडला आहे.

टाउबे यांचा जन्म कॅनडातील सॅक्सटून येथे ३० नोव्हेंबर १९१५ रोजी झाला व त्यांचे आधीचे शिक्षणही तेथेच झाले. १९४० साली त्यांनी कॅलिफोर्निया विद्यापीठाची पदवी मिळविली आणि १९४२ साली ते अमेरिकेचे नागरिक झाले. १९६२ सालापासून ते स्टॅनफर्ड विद्यापीठात रसायनशास्त्राचे प्राध्यापक आहेत. त्यांना पदव्या, पदके, पारितोषिके इत्यादी अनेक सन्मान मिळाले आहेत. ते साधे, नम्र व आनंदी वृत्तीचे आहेत.

रसायनशास्त्राला शास्त्राचा दर्जा प्राप्त होण्यापूर्वी बऱ्याच आधीपासून माणसाला रासायनिक विक्रियांची माहिती होती. विशिष्ट प्रकारच्या बाह्य परिस्थितीमध्ये पदार्थांचे गुणधर्म बदलतात, हे त्याच्या लक्षात आले होते व हेच रासायनिक विक्रियेचे वैशिष्ट्यदर्शक लक्षण आहे. उदाहरणार्थ, लोणारी कोळशाबरोबर मॅलॅकाइट नावाचे तांब्याचे धातुक जाळल्यास तांबड्या रंगाचा धातू (तांबे) मिळतो, हे प्राचीन ईजिप्शियनांना माहीत झाले होते. तसेच मृत्तिका भाजली, तर तिच्यापासून तिच्यापेक्षा अगदी भिन्न गुणधर्मांच्या मृत्तिका-वस्तू मिळतात, हेही पूर्वी माहीत होते.

याच्याही पुष्कळ आधी सुकलेले लाकूड पुरेसे गरम केल्यास पेट घेते म्हणजे विशिष्ट परिस्थितीमुळे द्रव्याच्या गुणधर्मात बदल होतो, हे माणसाला माहीत होते. शिवाय असा बदल घडून येण्याची गतीही पुष्कळ वेळा तपमानावर अवलंबून असल्याचेही त्याला माहीत होते. रासायनिक विक्रियांची गती अभ्यासणाऱ्या शाखेला रासायनिक गतिकी म्हणतात व विक्रिया कशी घडते हे स्पष्ट करणाऱ्या शास्त्रज्ञाला तिच्या यंत्रणेचा अभ्यास करावा लागतो.

परिकल्पना, प्रयोग व निरीक्षणे; नवीन परिकल्पना, नवे प्रयोग व निरीक्षणे यांमध्ये शेकडो वर्षांचा कालावधी गेल्यावर काहीशी निश्चित अशी वैज्ञानिक पार्श्वभूमी तयार झाली. त्यामुळे विसाव्या शतकाच्या सुरुवातीस विक्रियांच्या अभ्यासात पुष्कळच प्रगती झालेली होती. विशेषकरून विक्रियांचे भौतिकीय व गणितीय दृष्टींनी वर्णन केले जात होते. एखादी विक्रिया घडून येईल वा नाही, हे निश्चित करणारी स्थिती दर्शविण्यासाठी सूत्रे व आकृत्या वापरणे शक्य झाले होते; तसेच विक्रिया घडून येण्याची गती गणितीय सूत्रांनी दर्शविणे शक्य झाले होते. विक्रियेत रासायनिक समतोल असतो, हे लक्षात आले होते व त्याचा सैद्धांतिक दृष्टीने विचारही केला होता. विक्रियाशील आयन अथवा रेणू एकमेकांना रासायनिक बंधाने जोडलेले असतात व हे बंध कायमचे नसतात. म्हणजे ते तोडले वा जोडले जाऊ शकतात. आणि हे रासायनिक समतोलाचे वैशिष्ट्य असते.

अणुकेंद्राच्या सभोवती असलेल्या कक्षांमध्ये इलेक्ट्रॉन असतात. शेवटच्या कक्षेत एक वा अधिक इलेक्ट्रॉन कमी असल्यास अशी मूलद्रव्ये इलेक्ट्रॉनांचे स्थानांतरण करून स्थिर होऊ पहातात. शेवटच्या कक्षेतील अशा इलेक्ट्रॉनांना संयुजा इलेक्ट्रॉन म्हणतात. या इलेक्ट्रॉनांचे स्थानांतरण ( देवाण-घेवाण किंवा अदलाबदल ) हे रासायनिक विक्रियेच्या व बंधाच्या निर्मितीच्या मुळाशी असते. लोखंड, कोबाल्ट, मॉलिब्डेनम यांसारख्या संक्रमणी मूलद्रव्यांच्या अनेक संयुजा असतात. त्यामुळे त्यांची सहसंयुजी जटिले बनतात. त्यांच्या निर्मितीचा मूलभूत सिद्धांत आल्फ्रेड वेर्नर (१९१३ सालचे नोबेल पारितोषिक विजेते) यांनी मांडला होता; तर ही जटिले विद्रावात कशी वागतात याविषयीचे सिद्धांत इतरांनी मांडले आणि टाउबे यांनी या सिद्धांतांना पुरावा मिळवून दिला. रासायनिक विक्रिया कशा घडतात, हे त्यांनी शोधून काढले व त्यासाठी विक्रियांची गती मोजली; तसेच रेणू बनताना अथवा त्याचे तुकडे होताना इलेक्ट्रॉनांचे जे मार्ग असतात, त्या मार्गांचे चार्ट (आलेख वा रेखातक्ते) त्यांनी तयार केले.

पाण्यात विरघळलेले धातूंचे आयन इतर आयनांना वा रेणूंना आकर्षित करू शकतात. यालाच जटिलांची निर्मिती म्हणतात व हे बहुतकरून (नेहमीच नव्हे) समतोल विक्रियेच्या रूपात घडून येते. लाकूड जळणे व तांब्याच्या धातुकापासून तांब मिळणे या विक्रियांचे शेवटी ऑक्सिडीभवन व क्षपण असे व्यापकीकरण (सामान्यीकरण) करण्यात आले.

यापुढील व्यापकीकरण म्हणजे ऑक्सिडीभवन व क्षपण या दोन्ही क्रिया इलेक्ट्रॉनांच्या स्थानांतरणाशी निगडित असतात, हे होय. उदाहरणार्थ, विशिष्ट परिस्थितीत तीन धन विद्युत् भार असलेल्या कोबाल्टाची दोन धन विद्युत् भार असलेल्या क्रोमियमाशी विक्रिया घडवून आणता येते. या विक्रियेत क्रोमियमाला तीन तर कोबाल्टाला दोन धन विद्युत् भार मिळतात. परिणामी ऋण विद्युत् भारयुक्त इलेक्ट्रॉनाचे द्वीसंयुजी क्रोमियमाकडून त्रिसंयुजी कोबाल्टाकडे स्थानांतरण होते. विशेषत: धातवीय आयनांच्या जटिल संयुगांत हा आविष्कार वरचेवर घडून येतो. अशा धातवीय आयनांच्या जटिलांमध्ये होणाऱ्या इलेक्ट्रॉन स्थानांतरणाच्या यंत्रणेविषयीच्या संशोधनासाठी टाउबे यांना पारितोषिक मिळाले आहे. या स्थानांतरणाचे नियंत्रण करणाऱ्या रचनात्मक स्थितीचा टाउबे यांनी विशेष अभ्यास केला आहे. इलेक्ट्रॉनांचे स्थानांतरण होण्यापूर्वी ज्यांच्या जागांची अदलाबदल होते, अशा आयन वा रेणूंतील धातूच्या आयनांमध्ये एक पूल तयार होतो, असे त्यांनी अनेक उदाहरणांद्वारे सिद्ध केले. त्यामुळे हे स्थानांतरण कसे घडून येते, हे समजण्यास त्यांचे कार्य अधिक उपयुक्त ठरले आहे. (अर्थात सैद्धांतिक भौतिकी व रसायनशास्त्र यांच्यातील इलेक्ट्रॉन स्थानांतरणाच्या सर्वसाधारण प्रश्नाविषयी इतरांनी त्यांच्यापेक्षा अधिक संशोधन केले आहे).

नंतर त्यांनी दोन धातवीय आयनांमधील अशा पुलाची लांबी वाढते, असे दाखवून दिले. काही बाबतींत अशा धातवीय आयनांमधील अंतर जास्त असूनही इलेक्ट्रॉनांचे स्थानांतरण घडून येत असल्याचे, त्यांना आढळले. या स्थानांतरणाला त्यांनी 'दूरवर केलेला हल्ला' असे संबोधिले आहे. जटिलाचे द्विसंयुजी आयनाद्वारे क्षपण होण्यापूर्वी त्रिसंयुजी आयन पुलाच्या दोन्ही टोकांना बद्ध होतो, असे त्यांनी दाखविले. पुलाच्या दोन्ही टोकांना सारखेच त्रिसंयुजी आयन असताना होणाऱ्या इलेक्ट्रॉनीय क्षपणात या दोन्हींपैकी एका आयनाद्वारे इलेक्ट्रॉन पकडला जातो की तो दोन्हींमध्ये समाईक राहातो, याचा त्यांनी शेवटी अभ्यास केला. या क्षेत्रातील सैद्धांतिक व प्रायोगिक अध्ययनात तेच आधाडीवर आहेत.

टाउबे यांच्या संशोधनामुळे रसायनशास्त्राच्या कार्बनी व अकार्बनी रसायनशास्त्र या शाखांच्या एकीकरणाचा पाया घातला गेला आहे. रसायनशास्त्रातील प्रत्येक क्षेत्राच्या तसेच जीवविज्ञानातील विशिष्ट क्षेत्रांच्या ( उदाहरणार्थ, प्रकाशसंश्लेषण, प्रकाशरासायनिक विक्रिया इत्यादी ) दृष्टीने इलेक्ट्रॉन स्थानांतरण विक्रिया महत्त्वाच्या आहेत. शिवाय चयापचयातील विक्रियांवरही म्हणजे सजीवामध्ये सतत घडत असणाऱ्या भौतिक व रासायनिक घडामोडींवरही इलेक्ट्रॉन स्थानांतरण विक्रियेचा प्रभाव असतो, हे अधिक महत्त्वाचे आहे. त्यामुळे टाउबे यांच्या कल्पना विशेषत: जीवरसायनशास्त्रामध्ये उपयुक्त असल्याचे गेल्या दहा वर्षांत उघड झाले आहे. ज्या श्वसनक्रियेशी ऑक्सिजनाचा वापर निगडित असतो, अशा प्रकारच्या सर्व श्वसनक्रियांशी इलेक्ट्रॉन स्थानांतरण विक्रियेचा संबंध येतो. या क्षेत्रातील अधिकाधिक शास्त्रज्ञ टाउबे यांच्या संकल्पनांचा आपल्या संशोधनासाठी आधार घेत आहेत. जीवातील ऊर्जानिर्मितीच्या क्रिया समजून घेण्यासाठी टाउबे यांचे संशोधन आधारभूत ठरत आहे. तसेच रसायने बनविण्याच्या अधिक कार्यक्षम औद्योगिक प्रक्रियांच्या दृष्टीनेही टाउबे यांचे संशोधन उपयुक्त ठरले आहे.

## भौतिकी

या वर्षी फक्त भौतिकीचे नोबेल पारितोषिकच तेवढे विभागून देण्यात आले आहे व इतर पारितोषिके एकेकट्या व्यक्तीला मिळाली आहेत. भौतिकीचे नोबेल पारितोषिक दोघा खगोलभौतिकीविदांना अर्धे-अर्धे असे विभागून देण्यात आले आहे. ताऱ्यांची रचना व उत्क्रांती यांच्या दृष्टीने महत्त्वाच्या असलेल्या भौतिकीय प्रक्रियांमधील संशोधनासाठी सुब्रह्मण्यन् चंद्रशेखर यांना तर विश्वातील मूलद्रव्यांच्या निर्मितीतील महत्त्वाच्या अणुकेंद्रीय विक्रियांचा सैद्धांतिक व प्रायोगिक दृष्टींनी अभ्यास केल्याबद्दल विल्यम फाउलर यांना हे पारितोषिक देण्यात आले आहे.

ताऱ्यांची उत्क्रांती हा दोघांच्या संशोधनातील समाईक असलेला विषय म्हणता येईल. आकाश-गंगेसारख्या प्रचंड तारकासमूहाला दीर्घिका म्हणतात. अशा दीर्घिकांमध्ये वायू व धूळ यांचे बनलेले प्रचंड ढग असतात. या ढगांतील वायू व धूळ यांचे संघनन (एकत्रीकरण) होते व त्यामुळे त्याचे सावकाशपणे संकोचन होत जाऊन तारा निर्माण होतो. या प्रक्रियेमध्ये ऊर्जा बाहेर पडत जाते व तीमुळे तारा तप्त होत जातो. शेवटी ताऱ्याचे तापमान इतके प्रचंड होते की, ते तेथे अणुकेंद्रीय विक्रिया सुरू होण्यास पुरेसे असते. यातून ताऱ्याचा मुख्य घटक असलेला हायड्रोजन वायू जळत जाऊन त्यापासून हीलियम वायू बनत जातो. यातून जो दाब निर्माण होतो तो संकोचनाला विरोध करतो व त्यामुळे संकोचनाची क्रिया थांबते. अशा तऱ्हेने स्थिर झालेला तारा मग पुढे कोटयवधी वर्षे जगू शकतो म्हणजे तळपत राहू शकतो. ताऱ्यावरील हायड्रोजन संपून गेल्यावर दुसऱ्या प्रकारच्या अणुकेंद्रीय विक्रिया सुरू होतात. त्यांच्याद्वारे लोखंडापर्यंतची अधिकाधिक भारी (जड) असलेली मूलद्रव्ये निर्माण होत जातात. ताऱ्याची उत्क्रांती या टप्प्यापर्यंत झाली म्हणजे तारा आपल्या गुरुत्वाला तोलून धरू शकत नाही. याचा परिणाम म्हणजे तारा स्वतःच्याच गुरुत्वाकर्षणाच्या प्रभावाखाली आतल्या आत कोसळू लागतो, म्हणजेच ताऱ्याचा गुरुत्वीय अवपात सुरू होतो. या अवपाताचे नेमके स्वरूप ताऱ्याच्या वस्तुमानानुसार ठरते. काही बाबतींत अशा अवपाताला प्रचंड स्फोटाचे स्वरूप येते. या स्फोटाचा दृश्य परिणाम म्हणजे अशा ताऱ्याची दीप्ती (तेजस्विता) कोटयवधीपट वाढते व त्याला अतिदीप्त नवतारा म्हटले जाते. त्यामुळे छोटा, क्षणिक असा न्यूट्रॉनांचा अतितीव्र प्रवाह निर्माण होतो. त्याच्याद्वारे सर्वांत भारी मूलद्रव्यांची निर्मिती होते. कमी वस्तुमानाच्या म्हणजे सूर्याएवढे वस्तुमान असलेल्या ताऱ्याचा गुरुत्वीय अवपात होऊन तथाकथित 'श्वेत लघुतारे' (व्हाईट ड्वार्फ) निर्माण होतात. अशा ताऱ्यांच्या अति-उच्च तापमानामुळे त्यांच्यातून पांढरा शुभ्र प्रकाश बाहेर पडतो (सूर्यापासून येणारा प्रकाश पिवळा आहे). तसेच यांचे वस्तुमान जवळजवळ सूर्याएवढे असले, तरी यांचे आकारमान पृथ्वीएवढे असते. म्हणून त्यांना वरील नाव पडले आहे. अशा लघुताऱ्यातील द्रव्य दाबले गेलेले असल्याने त्याची घनता वाढून तेथील १ घनसेंटीमीटर द्रव्याचे वजन सुमारे १ किलोग्रॅम (पृथ्वीवरच्या द्रव्याच्या २० पट) झालेले असते. कारण अणूभोवतीच्या इलेक्ट्रॉन-कक्षा चुरडल्या जाऊन तारा हा अणुकेंद्रे व इलेक्ट्रॉन वायू यांचाच बनलेला असतो. याहून किंचित जास्त वस्तुमानाच्या ताऱ्यांच्या बाबतीत शेवटच्या टप्प्यात यापेक्षाही अधिक प्रमाणात ताऱ्याचे द्रव्य दाबले जाते. यामुळे अणुकेंद्रे व इलेक्ट्रॉन यांचा संयोग होऊन केवळ न्यूट्रॉनांच्या रूपातील द्रव्यच ताऱ्यात असते. म्हणून अशा ताऱ्याला 'न्यूट्रॉन तारा' म्हणतात. याचे वस्तुमान अंदाजे सूर्याच्या तीनपट तर व्यास सुमारे १० किलोमीटर असतो. सूर्याच्या २-३ पटींहून अधिक वस्तुमान असणाऱ्या सर्वांत भारी ताऱ्यांच्या बाबतीत गुरुत्वीय प्रेरणा इतकी प्रबळ होते की, त्यांतून सूर्यप्रकाशसुद्धा मुक्त होऊ शकत नाही. म्हणजेच ताऱ्याचे दृश्य स्वरूप लयाला जाते व म्हणून त्याला 'कृष्णविवर' म्हणतात. चंद्रशेखर व फाउलर या दोघांचे कार्य या तारकीय उत्क्रांतीशी निगडित आहे. पैकी फाउलर यांचे संशोधन येथे प्रथम दिले आहे व नंतर चंद्रशेखर यांच्या संशोधनकार्याचा तपशील दिला आहे.

फाउलर यांचा जन्म अमेरिकेतील पीट्सबर्ग येथे ९ ऑगस्ट १९११ रोजी झाला. १९३६ साली त्यांनी कॅलिफोर्निया इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी (पॅसाडीना) ची पीएच्. डी. पदवी संपादन केली आणि १९४६ सालापासून ते तेथेच भौतिकीचे प्राध्यापक म्हणून आहेत.

फाउलर यांचे संशोधनकार्य हे ताऱ्यांची उत्क्रांती होताना त्यांच्यात होणाऱ्या अणुकेंद्रीय विक्रियांशी निगडित आहे. ताऱ्याकडून प्रारित होणाऱ्या ऊर्जेच्या निर्मितीच्या दृष्टीने पाहता या विक्रिया महत्त्वाच्या आहेतच; शिवाय मुख्यत्वे हायड्रोजन या सर्वांत हलक्या मूलद्रव्याच्या आद्य द्रव्यापासून इतर मूलद्रव्यांची निर्मिती या विक्रियांद्वारे होत असल्याने त्यांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. फाउलर यांनी अशा तऱ्हेने खगोलभौतिकीच्या दृष्टीने महत्त्वाच्या असलेल्या या विक्रियांचा प्रयोगांद्वारे विस्तृत अभ्यास

अनुक्रमणिका

तर केलाच; शिवाय त्याचबरोबर त्यांनी या विक्रियांचे सैद्धांतिक हिशोबही मांडले आहेत. विश्वातील मूलद्रव्यांच्या निर्मितीविषयीचा संपूर्ण सिद्धांत फाउलर व त्यांच्या सहकाऱ्यांनी १९५०–६० या दशकात विकसित केला. अजूनही या क्षेत्रामध्ये हा सिद्धांतच आधारभूत मानला जातो. अणुकेंद्रीय भौतिकी व अवकाशविज्ञान या क्षेत्रांत अगदी अलीकडे झालेल्या संशोधनामुळे या सिद्धांताची खातरजमाच झाली आहे. अशा प्रकारे या सिद्धांताद्वारे निसर्गात आढळणाऱ्या मूलद्रव्यांच्या निर्मितीचे स्पष्टीकरण देता येते.

तारे वा दीर्घिका निर्माण होण्याऱ्या खूप आधी म्हणजे विश्वनिर्मितीच्या पहिल्या काही स्फोटक क्षणांतच (सेकंदांत) हायड्रोजनापासून ते युरेनियमापर्यंतची सर्व नैसर्गिक मूलद्रव्ये निर्माण झाली होती, असे १९४०–५० दरम्यानच्या दशकात सुचविण्यात येई. मात्र फाउलर व त्यांच्या सहकाऱ्यांनी कणवेगवर्धकाच्या साहाय्याने प्रत्येक नैसर्गिक मूलद्रव्य निर्मिणाऱ्या अणुकेंद्रीय विक्रियांची एक मालिकाच उघड केली. जवळजवळ सर्वच मूलद्रव्यांची निर्मिती होण्यासाठी ताऱ्यांवर असलेल्या प्रचंड भट्ट्यांची गरज असते, असे त्यांनी या विक्रियांच्या आधारे दाखवून दिले. तसेच सूर्य तळपण्यास कारणीभूत असू शकतील अशा अणु-संघटनाच्या ( एकत्रीकरणाच्या ) दोन विक्रियाही त्यांनी सुचविल्या आहेत.

सूर्याएवढ्या ताऱ्यात हायड्रोजनापासून हीलियम बनतो; तर त्यापेक्षा मोठ्या ताऱ्यात हीलीयमापासून कार्बन व ऑक्सिजन बनतात आणि अधिक असामान्य ताऱ्यांमध्ये कार्बन व ऑक्सिजन यांच्यापासून अधिक जटिल अणू (भारी मूलद्रव्ये) बनतात, असे त्यांनी सुचविले आहे. अशा प्रकारे ताऱ्याची उत्क्रांती व मूलद्रव्यांची निर्मिती यांच्यांत काहीतरी संबंध असावा, असे दिसते.

याशिवाय त्यांनी तारकीय गतिकी, द्रवगतिकीय स्थैर्य, आयनद्रायू भौतिकी, सापेक्षीय खगोलभौतिकी, अक्षीय परिभ्रमणशील कृष्ण विवर, ताऱ्यांची रचना व क्वासारमधील व्यापक सापेक्षीय परिणाम या ज्योतिषशास्त्र व भौतिकी यांच्यातील समाईक विषयांवरही संशोधन केले आहे. अशा तऱ्हेने त्यांच्या कार्यामुळे ते काम करीत असलेल्या केलॉग रॅडिएशन लॅबोरेटरीला खगोलभौतिकी या विषयाची 'काशी' मानले जाऊ लागले आहे.

चंद्रशेखर यांचा जन्म लोहोरला १९ ऑक्टोबर १९१० रोजी झाला. आधीचे शिक्षण प्रेसिडेन्सी कॉलेज ( मद्रास ) मध्ये झाले. १९३० साली ते बी. ए. झाले. नंतर ते ट्रिनिटी महाविद्यालयात (केंब्रिज) गेले. १९३६ साली त्यांनी तेथून पीएच्. डी. पदवी संपादन केली. तेथून ते गटिंगेन, ल्येझ, मॉस्को, लेनिनग्राड, पॅरिस इत्यादी ठिकाणी गेले. शेवटी १९३६ साली प्रसिद्ध ज्योतिषशास्त्रज्ञ ऑटो स्ट्रूव्हे यांनी त्यांना शिकागो विद्यापीठात नेले. त्याच वर्षी त्यांच्या सहाध्यायी असलेल्या ललिता दोरायस्वामी यांच्याशी त्यांचा विवाह झाला. १९४२ साली त्यांनी एस्सी. डी. ही पदवी मिळविली; तर १९५३ साली त्यांनी अमेरिकेचे नागरिकत्व स्वीकारले. त्यांचे बहुतेक संशोधन हे शिकागो विद्यापीठातील यर्कीझ वेधशाळेतच झाले आहे. तेथे संशोधन साहाय्यक, साहाय्यक प्राध्यापक व प्राध्यापक म्हणून त्यांनी काम केले आणि १९४६ पासून ते तेथे मॉर्टन डी. हल डिस्टिंग्विश्ड सर्व्हिस प्राध्यापक म्हणून आहेत. १९५९ पासून १९७१ पर्यंत त्यांनी 'ॲस्ट्रोफिजिकल जर्नल'चे कार्यकारी संपादक म्हणूनही काम केले आहे. त्यामुळे या नियतकालिकाला प्रतिष्ठा मिळाली. त्यांना अमेरिका, भारत व जगातील अनेक संस्थांची पदके, पारितोषिके व सदस्यत्व; तसेच विविध विद्यापीठांच्या सन्माननीय पदव्या वगैरे सन्मान मिळाले आहेत.

त्यांचे नोबेल पारितोषिक हे त्यांच्या ७३ व्या वाढदिवशी जाहीर झाले. त्यांच्या आधी खोराना या अमेरिकेत स्थायिक झालेल्या भारतीयाला नोबेल पारितोषिकाचा बहुमान १९६८ साली मिळाला होता. अशा प्रकारे भारतीय उपखंडातील विज्ञानातील हा सन्मान मिळविणारे चंद्रशेखर हे चवथे गृहस्थ होत ( सी. व्ही. रमण व अब्दुस सलाम हे इतर दोघे होत.) ते शाकाहारी, नास्तिकवादी व स्वभावाने लाजाळू असून त्यांच्या हृदयावर एक शस्त्रक्रिया झालेली आहे.

चंद्रशेखर यांचे संशोधन हे ताऱ्यांच्या उत्क्रांतीमधील अनेक घटनांशी निगडित आहे. त्यांचे महत्त्वाचे कार्य म्हणजे ताऱ्यांच्या उत्क्रांतीमधील विविध

अवस्थांच्या स्थैर्याविषयीच्या प्रश्नांवर केलेले संशोधन हे आहे. अलीकडील काळात त्यांनी सापेक्षीय परिणामांचा अभ्यास सुरू केला आहे. ताऱ्यांच्या उत्क्रांतीतील नंतरच्या टप्प्यांमध्ये उद्भवणाऱ्या टोकाच्या परिस्थितींमुळे या परिणामांचे अध्ययन होणे महत्त्वाचे झाले आहे. बहुधा त्यांचे सर्वांत मोलाचे कार्य मात्र त्यांच्या वयाच्या २०-३० वर्षांच्या काळात झालेले आहे. यापैकी काही संशोधन ते १९३० च्या सुमारास इंग्लंडला गेले तेव्हा त्यांनी जहाजावर केलेले आहे. लघुताऱ्याच्या रचनेचे अध्ययन, हे ते कार्य होय. हे संशोधन जुने असले, तरी अलीकडच्या काळात ज्योतिषशास्त्र व अवकाशविज्ञानाच्या अध्ययनात जी प्रचंड प्रगती झाली आहे, तीमुळे या संशोधनाविषयी नव्याने उत्सुकता निर्माण होऊन त्याला उजाळा मिळाला आहे.

तारकीय उत्क्रांती व ताऱ्यांची अंतर्गत रचना यांविषयी अभ्यास करताना त्यांनी लघुतम ताऱ्याविषयीचा आपला सिद्धांत विकसित केला. ताऱ्यावरील हायड्रोजन वायू जळून गेल्यावर तेथील ऊर्जानिर्मितीचे प्रमाण कमी होईल. त्यामुळे ताऱ्याचे आकुंचन होईल व त्यातून बाहेर पडणाऱ्या प्रारणाचे प्रमाण कमी होईल. मात्र वस्तुमान जवळजवळ तेवढेच राहिल्याने ताऱ्याची घनता वाढेल. अशा तऱ्हेने दाब वाढत जाईल व त्यामुळे शेवटी अणूची अंतर्गत रचना मोडून पडेल. या अवस्थेत आकुंचन थांबेल व तारा लघुताऱ्याच्या अवस्थेला पोचेल. या ताऱ्याच्या वस्तुमानानुसार त्याची घनताही जास्त होईल. तथापि ज्या ताऱ्यांचे वस्तुमान सूर्याच्या वस्तुमानाच्या १·४४५२ पटीपर्यंत आहे, अशाच ताऱ्यांच्या बाबतीत घनतेत अशी वाढ होत जाईल, असे चंद्रशेखर यांचे म्हणणे आहे. ( यामुळे या वस्तुमानाच्या सीमांत मूल्याला 'चंद्रशेखर सीमा' संबोधण्यात येते व ही संज्ञा आता पाठ्यपुस्तकातून रूढही झाली आहे. ) यापेक्षा अधिक वस्तुमान असणाऱ्या ताऱ्याचे वस्तुमान कमी होईल. प्रचंड स्फोटाद्वारे द्रव्य त्यातून निघून जाईल व अतिदीप्त नवताऱ्याचा जन्म होईल. ( याहीपेक्षा मोठ्या वस्तुमानाचा तारा स्वतःच्या वजनाखाली कोसळून कृष्णविवर बनेल ). चंद्रशेखर यांनी मांडलेला हा सिद्धांत विश्वस्थितिशास्त्रामध्ये व ताऱ्यांची रचना समजून घेण्याच्या दृष्टीने उपयुक्त ठरला आहे.

याशिवाय चंद्रशेखर यांनी पुढील संशोधनही केले आहे. १९४०-५० दरम्यानच्या काळात त्यांनी आपल्या काकाप्रमाणेच ( सी. व्ही. रमण ) प्रकाशाच्या विकिरणाचा ( विखुरला जाण्याचा ) अभ्यास केला आणि आकाश निळे कशामुळे दिसते, ते स्पष्ट केले. त्यांनी हायड्रोजन आयनाविषयी केलेले संशोधन हे सूर्याच्या तेजोवलयाची अपारदर्शकता स्पष्ट करण्याच्या दृष्टीने उपयुक्त ठरले आहे. ताऱ्यांचे रासायनिक संघटन, तारे व ग्रह यांच्या वातावरणांच्या ऊर्जेमध्ये होणारे बदल, सूर्याच्या पृष्ठभागी होणारे संनयन, आद्य ताऱ्याच्या प्रकाशाचे एकाच पातळीत होणारे कंपन, अतिदीप्त नवताऱ्याची उत्पत्ती वगैरेंविषयीही त्यांनी संशोधन केले आहे. त्यांनी एक प्रकारचे 'गुरुत्वीय घर्षण' शोधून काढले आहे; हे घर्षण दीर्घिकांची वर्तणूक समजून घेण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. भौतिकीतील काही अवघड प्रश्नांचे त्यांनी गणितीय दृष्टीने सखोल अध्ययन केले आहे. अलीकडील काळात त्यांनी चुंबकीय क्षेत्र असताना व नसताना द्रवातील अथवा वायूतील अभिसरणाच्या हालचाली कशा होतात, याचा अभ्यास केला आहे. तसेच सापेक्षता सिद्धांताचा व त्याच्या आधारे कृष्णविवराचाही त्यांनी अभ्यास सुरू केला आहे.

चंद्रशेखर यांनी आपल्या संशोधनाच्या संदर्भात अनेक पुस्तके व जगातील विविध देशांतील नियतकालिकांतून असंख्य शोधनिबंध लिहिले आहेत. त्यांचे 'ॲन इंट्रॉडक्शन टू स्टडी ऑफ स्टेलर स्ट्रक्चर' हे १९३९ साली लिहिलेले पुस्तक अजूनही या विषयातील प्रमाणभूत पाठ्यपुस्तक व संदर्भग्रंथ म्हणून उपयुक्त आहे. याशिवाय त्यांनी पुढील पुस्तकेही लिहिली आहेत : प्रिन्सिपल्स ऑफ स्टेलर डायनॅमिक्स ( १९४२-४३ ), रेडिएटिव्ह ट्रान्स्फर ( १९५० ), हायड्रोडायनॅमिक्स ॲंड हायड्रोमॅग्नॅटिक स्टॅबिलिटी ( १९६१ ) आणि एलिप्सॉयडल फिगर्स ऑफ इक्विलिब्रियम ( १९६९ ).



# गोंड परधानांची लग्नगीते

व्यंकटेश आत्राम

" गोंड परधान " या आदिवासी जमातीत जन्मापासून मरणापर्यंतच्या सर्व घडामोडी काही विशिष्ट परंपरा, संकेत आणि रूढ पद्धतीनुसार घडत असतात. त्यातही नृत्य, गायन व वाद्यवादनांचा नुसता कहर केला जातो. जिवती, आषाढी, दिवाळी आणि होळीला तर परधानांचा आनंद गगनात मावेनासा होतो. प्रत्येक सणाला नृत्यगायनाची तर लयलूट असते. केवळ सणाने त्यांची हौस पूर्ण होत नाही, तर समाजात एखाद्याच्या घरी मूल जन्माला आले, तरी त्याच्या 'चुडुर सोबनी', 'फळा सोबनी' म्हणजे सातवी, बारशाच्या निमित्ताने नाचगाण्याची आपली हौस ते पुरी करतात. एखाद्याच्या घरी लग्नप्रसंग जर घडून आला, तर सर्व परधानांना तो आनंदोत्सव ठरतो. लग्नाच्या त्या पाचदहा दिवसांत नाचगाण्याची धमाल चाललेली असते व आयुष्यातील सर्व दुःखे विसरून ते त्या वेळी केवळ जल्लोश करीत असतात.

आपल्या दारिद्र्यमय जीवनात थोडासा विरंगुळा शोधण्यापुरते, किंवा थोडेसे मनोरंजन करण्यापुरतेच गोंड परधानलोकांना त्यांच्या लग्नगीतांचे महत्त्व नाही, तर त्या लग्नगीतांमधून त्यांना कुळाचार, उपदेश, संस्कृती व लग्नविधी शिकायला मिळतात. त्यांच्या लग्नगीतांमध्ये परधानांच्या भावजीवनाचे हुबेहूब दर्शन घडते. रागद्वेष, प्रेम आणि करुणा त्यांच्या या गीतांत ओथंबते. लग्नगीतांच्या माध्यमातून 'वधू-वर' आणि साऱ्या परधानसमाजाला त्यांची आचारसंहिता शिकविली जाते. त्या दृष्टीने गोंडी परधानी लोकगीतांचे आगळेच महत्त्व आहे.

पूर्वी परधान लोकांमध्ये नऊ दिवसांचा लग्नसोहळा साजरा केला जात असे. परंतु आता मात्र पाच दिवस किंवा तीन दिवसच लग्नसोहळा असतो. कालमानाप्रमाणे परधानसमाजात काहीसा बदल घडत आहे. म्हणून कुठे कुठे एका दिवसातही लग्न आटपून घेतल्याची उदाहरणे आहेत.

पूर्वी उपवर झालेल्या मुलीकरता 'लमजान' लमजोड किंवा घरजावई ठेवण्याची पद्धत होती. वरमुलगा प्रपंच चालविण्यास योग्य झाल्याची खात्री पटल्यावर व मुलीची त्याच्यावर मर्जी बसल्यावर त्यांचे लग्न करून दिले जात असे. परंतु अलीकडे घरजावई ठेवण्याची पद्धत मात्र नष्ट झाली आहे.

## सोईरसंबंध जुळविणे

सोईरसंबंध जुळविण्याकरिता वरपक्षाचे लोक वधूच्या घरी जातात. सोयरीक जुळण्यापूर्वी वरमुलाकडून विशिष्ट माहिती विचारली जाते व त्याच्यावर खालीलप्रमाणे " भिडी " टाकली जाते–

जातीरो बाती रिच्योरे दादा । ?
जातीरो बाती भिडी रो दादा । ?

(अरे ! तरुण माणसा ! तुझी जात–गोत्र काय आहे ? तुझ्या जातीची व कुळगोत्राची उकल सांग.) वरमुलगा खालीलप्रमाणे भिडीची उकल करून सांगतो–

चांदेकार, भोंदेकार नीत नवराल कुम्मेकार।
जातीरो (कुलनाम) अना रिच्योर दादा ॥

[ मी कोणी भोंदू माणूस नसून चांद्याकडील उच्च घराण्यातील ताम्रघटाप्रमाणे नित्य नवरदेव बनू शकणारा ( अमुक कुळाचा ) तरुण आहे. ]

: मुलगा हा तांब्याच्या भांड्याप्रमाणे, तर मुलगी ही मातीच्या मडक्याप्रमाणे नाजूक असते, असे त्यांचे मत आहे. अशी उकल केल्यानंतर त्यास खालीलप्रमाणे प्रश्न विचारले जातात–

१) निवांग बचोले पेन्क मंदांग ?
तुझे किती देव आहेत ?
२) बोना विज्जा आंदी ?
तू कुणाचे बीज आहेस
३) बदेना पाल उंट्टी ?
कुणाचे दूध प्यालास ?

वरील प्रश्नांच्या उत्तरात मुलाच्या बीज-गोत्रातील देव आणि दूधगोत्रातील देवसंख्या वेगवेगळी आली, आणि मुलाच्या बीजगोत्राचे किंवा दूधगोत्राचे भिन्न गोत्रामध्ये मुलीचे गोत्र असले की, सोईरसंबंध पक्के होतात.

अनुक्रमणिका

गोंड परधानसमाजात चार, सहा वगैरे सम देवसंख्या असणारे कुलगोत्र-संच आणि तीन, पाच, सात वगैरे विषम देवसंख्या असणारे कुलगोत्र-संच (Clan sects) आहेत. आत्राम, उमके, गेडाम, तुमडाम हे सहादेवे समसंख्यी गोत्र-संचातील होत, तर मडावी, मलावी, मसराम, धुर्वे, खंडा तेवगैरे सातदेवे विषमसंख्यी गोत्र-संचातील होत. गोंड परधानसमाजात एकाच गोत्र-संचातील गोत्राच्या मुलामुलींची लग्ने होऊ शकत नाहीत; कारण ती सर्व बीज-गोत्रे असतात आणि दूध-गोत्र हे वेगळ्या गोत्र-संचातील गोत्रांमध्ये येते. आई ही मामाच्या गोत्रातील असते म्हणून मामकूळ हे दूध-गोत्रात येते. पूर्वी दूध-गोत्रातील म्हणजे मामाच्या मुलीशी लग्न लावत नसत. कारण ते दूध-गोत्र असल्यामुळे त्या गोत्रातील मुलगी ही मातेसमान मानली जात असे. तसेच बीज गोत्रातील मुलगी ही बहीणच मानली जात असे. अलीकडे मात्र दूध-गोत्रातील मुलगी लग्नाला चालते.

संबंध पक्के झाल्यावर सोयरीक केली जाते. मुलीला कुंकू लावण्याच्या वेळी आरतीचे दहा रुपये व गोना झाडी म्हणून दोन रुपये मुलाकडून आरतीत टाकण्यात येतात. तसेच पंचबैठकीचे तीन रुपये (त्यांत एक रुपया मुलीकडून असतो) आरतीत टाकण्यात येतात. वराकडून वधूला काय काय द्यायचे ठरले ते पंचांसमोर जाहीर रीत्या सांगण्यात येते विदर्भात साधारणतः दोन कुडव ज्वारी किंवा गहू व सात कुडव बेल्डा म्हणजे डाळ, तांदूळ वगैरे किरकोळ धान्य तसेच दागिन्यांपैकी सरी, साखळी, खागोरा, जोडवी, माटघा, गोलुटघा वगैरे चांदीचे दागिने वधूपक्षाला देण्याची अजूनही प्रथा आहे. अलीकडे चांदीच्या दागिन्यांऐवजी सोन्याची बीरी व एकदाणी देण्याची पुष्कळ ठिकाणी प्रथा सुरू झाली आहे. वरीलप्रमाणे कबूल झालेले सामान लग्नापूर्वी पाच दिवस अगोदरच खरेदी करून वधूपक्षाकडे पाठविले जाते. यालाच "खर्चांग" असे म्हणतात. वधूपक्षाकडे वरीलप्रमाणे "खर्चांग" पोचते होताच मुलीला पहिले नहाण घातले जाते. म्हणजे मुलीला नवरी बनविण्यात येते. "खर्चीचे" पाणी डोक्यावर पडताच मुलगी मूठभर वाढते, अशी परधानलोकांची समजूत आहे. म्हणून पहिल्या नहाणास त्यांच्यामध्ये फार महत्त्व आहे. आणि लग्न सोहळ्याचाही तो पहिलाच दिवस असतो. नहाणाच्या वेळी पुढील गीत गातात :

जाती रो बाती मियाळे दादा।
येर डेहकी लाता दे।
जाती (ढेके) मियाळे दादा।
येर डेहकी लाता दे ॥ १ ॥
लाडीना वेरोदे संगो।
येनी पोहेमाता दे।
लाडाना येरोदे संगो।
गधाल पोहे माता दे ॥ २ ॥
येनी पोहे माता ते संगो।
गंगा पोंगी लाता दे।
गधाल डुबे माता दे संगो।
डोब सचे माता दे ॥ ३ ॥
मुने मुने नवरी, पजा पजा टवरी।
टवरीता नीय झलके माता दे, भाभीदरे।
लाडीना वेरोदे संगो, येनी पोहे माता दे ॥४॥

(ही कुणाची, कोणत्या गोत्राची मुलगी आहे बरे? जल क्रीडा करीत आहे.

अरे, ती (अमुक गोत्राची, अमक्याची) लेक होय. जलक्रीडा करीत आहे. अगं सखी! ही तरुणी पाण्यामध्ये हत्तीप्रमाणे शांतपणे पोहत आहे. तर तो तरुण त्या पाण्यात गाढवाप्रमाणे बुचकळ्या खात आहे.

बाईच्या हत्तीला पोहण्याकरिता पवित्र गंगाच जणू अवतरली आहे. पण साचलेल्या डबक्यात त्या तरुणाचा गाढव गटांगळ्या खात आहे.

पुढेपुढे नवरी तिच्या पाठीमागे पणती. त्या पणतीतील तेलदेखील बाईसाठी उसळून येते. नवरीबाईच्या वेळी पाण्यात हत्ती जलक्रीडा करीत आहे).

मुलीला याप्रमाणे पहिले नहाण घालून हळद लावतात. तसेच त्याच दिवशी मुलालाही पहिले नहाण घालून हळद चढवितात. त्यापूर्वी गावभर हळद फिरवून सुवासिनींच्या हस्ते हळद दळली जाते. त्या वेळी म्हणावयाचे गीत असे :

वद लाडीना रोता जत्ता ओ।
नावोनी याया ओ।
(अमुक) लाडीना रोता ओ।
नावोनी याया ओ।








जत्ता मालोनी अरता ओ।
नावोनी याया ओ।
(अमुक) लाडीना रोता ओ। नाओनी याया।
कैशार झुरनी अरता ओ।
(अमुक) लाडीना रोता ओ। नाओनी याया।
झारना झुरनी अरता ओ।

अर्थ :–जाते उदास पडले. कोणत्या तरुणीच्या घरचे हे जाते आहे? अग आई गं! (अमुक) तरुणीच्या घरचे हे जाते अगदी उदास होऊन पडले आहे. अग आई गं, (अमक्या) त्या तरुणीच्या घरचा फडा पहा अगदी झुरत आहे. अगं, अगं! त्या तरुणीच्या घरचे झारणेदेखील झुरणी पडलेले आहे.

घरातील प्रत्येक वस्तू नवऱ्यामुलीला सोडून जाण्याच्या कल्पनेने अत्यंत उदास झालेली आहे. आणि घरातील प्रत्येक जीव दुःखी झालेला आहे, असा भाव वरील गीतात व्यक्त होतो व प्रत्येक वस्तूंचे नाव घेऊन जसजशा महिला हे गीत म्हणतात, तसतशी नवरीमुलगी आपल्या लग्नानंतर घरातील सर्व वस्तू सोडून जाण्याच्या कल्पनेने स्फुंदून स्फुंदून रडू लागते. वरीलप्रमाणे जाते शोधून पाहिल्यावर सुवासिनी जात्यावर हळद दळतात. तेव्हा खालील गीत म्हणतात. यालाच "पिची नोरमाळा" असे म्हणतात–

पिची नोराले वळावो अंगे वो।
पिची नोराले वळावो॥
नी मनता सिरियाल अंगे।
दादाना मनते वायो वो॥
दामु जोडे किसी अंगे।
निवा सिरियाल तत्ती वो॥
निवा मनता सिरियाल अंगे।
दादाना मनते वायो वो॥
जत्ता घोंदीते उदंदी वो।
झापे तो झापे कुळकंदीवो॥
निवा मनता सिरियाल अंगे।
दादाना मनते वायो वो॥
निवा लाडोक शेरंडूना अंगे।
वल्ले लाडो किदी वो॥
जाती बाती मियानी अंगे।
पिची नोराळे वळावो॥



"हळद दळायला ये गं वहिनी! हळद दळायला ये. तुझ्या मनाची तुझी जाऊ गं वहिनी, दादाच्या मनपसंत नाही. दाम जोडून वहिनी! तू तुझी जाऊ पसंत करून आणली. पण तुझ्या पसंतीची जाऊ आमच्या दादाला पसंत नाही. जात्याच्या अंधारखोलीच्या कोपऱ्यात बसून तुला झोपेची लटक येत असे. पण वहिनी! तुझ्या पसंतीची जाऊ दादास अजिबात पसंत नाही. हे वहिनी! मी तुझा लाडका दीर आहे. माझे तू बरेच लाड पुरविलेस. तू उच्च घराण्याची लेक आहेस. तू हळद दळायला ये."

परधानसमाजात हळद दळण्याकरिता वधूवराची वहिनी किंवा त्यांच्या थट्टेचाची होत असणाऱ्या सुवासिनीलाच पाचारण केले जाते. कुटुंबामध्येही वहिनीचा मातेप्रमाणेच मोठा मान राखला जातो. ते वरील गीतातूनही समजून येते.

हळद दळल्यानंतर ती भिजवून प्रथमतः ती सर्व देवांना चढविली जाते. नंतर नवरदेव किंवा नवरीस हळद चढविली जाते. त्यावेळचे गीत खालीलप्रमाणे असते. त्यालाच "पिची तरूमाळ" असे म्हणतात.

पिची तरूमाळ
दादारे दादा इंदाले बाई ओ।
बोरे तो दादाने मुटाले बाई वो।
पहिलो तो पिची नार्टेदोर मेळघाने।
दुसरो तो पिची नार्टेदोर भीमाने।
तिसरो तो पिची नार्टेदा यायाने।
पजाडा पिची शिवाऱ्याल भोवाऱ्याने।
दादाले दादा इंदाले बाई वो।
बोरे तो दादाने मुटाले बाई वो॥

"दादा, दादा असा आक्रोश ही बहीण करील. कोणत्या बरे भावाच्या नावाने ही आक्रोश करीत आहे? सर्वप्रथम गावाच्या मुख्य देवतेला हळद चढेल. नंतर गावच्या भीम देवाला हळद चढेल. तिसऱ्यांदा गावच्या देवीमातेस हळद चढेल. शेवटी गावशिवेवर पहारा देणाऱ्या शिवाऱ्या देवाला आणि भोवताली गस्त घालणाऱ्या भोवाऱ्या देवास हळद चढेल. दादा, दादा असा आक्रोश ही बहीण करील. कोणत्या भावाला विनवील बरे ही बहीण?"

अगोदर देवी-देवतांना हळद चढवून नंतरच नवरी किंवा नवरदेवास हळद चढविली जाते. त्याच





वेळी मंत्राने भारलेली कटयार नवरदेवाच्या हातात दिली जाते. गळयात चांदीची सर–साखळी, खागोरा इत्यादी स्त्रियांचे दागिने घालतात व त्याच्या अंगावर एक कांबळे देण्यात येते. नवरदेवाला स्त्रियांचे दागिने घालण्यामागे हेतू हाच, की लग्न झालेल्या किंवा होऊ घातलेल्या पुरुषामध्ये अर्धांगी पार्वती म्हणजेच त्याची पत्नी त्याची अर्धांगिनी असते. अर्धांगी धारण करण्याचा हा लग्नाचा पहिला दिवस म्हणजेच मुहूर्ताचा दिवस असतो. त्या दृष्टीने या दिवसाला व या प्रसंगाला फार महत्त्व असते. हळद लागल्यावर नवरीस किंवा नवरदेवास सामुदायिक रीत्या पहिले नहाण घालतात. यालाच "नहानोयंग" असे म्हणतात. नवरदेवाच्या पहिल्या आंघोळीच्या वेळी खालील गीत म्हटले जाते–

आती काकान सिरी बासेंगा ।
कोईका राजा का बेटा, आंगोरीको बैठे वो ।
(ठेक्या) राजाका बेटा आंगोरीकू बैठे वो।
दाई दादानसिरी बासेंगा ।

"आत्या, काका किंवा भाऊबंदांच्या आधीन याचे बिचाऱ्याचे जीवन गेले आहे. आज त्याचा दिवस उजाडला आहे. आज तो कोण राजपुत्र आंघोळीला बसला आहे ? "

लग्नसोहळयाच्या पहिल्याच दिवशी वधूवरांच्या अंगणात लग्नमंडप घालतात. या मंडपाचे नऊ खांब असतात व मंडपावर जांभळी, पिंपळ व आंब्याच्या फांद्या टाकून सावली करतात. पुढील गीत पहा–

झोनोका कोनो भाईरे मेरा,
मंडवा तो उठायो ।
चारोंजी भाईरे मेरा, मंडवातो उठायो ॥ १ ॥
सालेका डेरीरे डेरी, जामुनका साया ।
चांदीका आसवा सोनेकी आडुली ।
भले तो भले भाईरे मेरा, मंडवा तो उठायो ॥२॥
( आंडवा = गाडगे
आडुली = लहान टोपली )

## लग्नसोहळ्याचा दुसरा दिवस

परधानलोक लग्नसोहळयाच्या दुसऱ्या दिवशी आपापली घरची कामे आटोपून लग्नघरी जमतात व लग्नसोहळयाच्या कार्यक्रमाची योजना आखतात. वरपक्षाकडून पाठविलेले "खर्चाचे" सामान वधूच्या दूधगोत्रजाच्या घरी नेऊन ठेवले जाते. आज मात्र ते सर्व "खर्चसामां" मोठया गाजावाजाने लग्नमंडपात आणावयाचे असते. ढोलबासरीच्या गजरात परधान लोक "खर्चसामां" आणायला जातात तेव्हा खालील गीत म्हटले जाते—

"कुंभारीन बाईवो कुंभार कुठे गेला ।
हाती कुदरी धरिला बाई माती खांदाले गेला ।
माती खांदता खांदता बाई पाय मोडून गेला ॥
कुंभारीन बाईवो कुंभार कुठे गेला ।
हाती सोटा धरला बाई गधे राखाले गेला ।
गधे राखता राखता बाई हात मोडून गेला ॥"

दिरमातण, सुपल्याटोपल्या, गाडगे, दिवनाल्या वगैरे "खर्चसामां" घेऊन सर्व मंडळी लग्नमंडपाकडे निघते. त्यावेळी खालील गीत सुरू असते—

हे खर्चा जाते, हे खर्चा जाते,
नवरदेवच्या मांडवी नवरदेवच्या मांडवी ।
हे खर्चा जाते, हे खर्चा जाते,
कोणाच्या मांडवी कोणाच्या मांडवी ।
आगाशी मांडवी आगाशी मांडवी ।
धारतेरी बोवोला धारतेरी बोवोला ॥
(धारतेरी बोवोला = धरीत्री हीच बोहले)
(आगाशी मांडवी = आकाश हेच मांडव)

लग्नमंडपात "खर्चसामां" आणून सोयऱ्यांचे पाय धुण्यात येतात व दिरमातणाची स्थापना करण्यात येते. बोवल्यावर सालईची फांदी रोवण्यात येते व नंतर नवरी किंवा नवरदेवाला दुसरे नहाण घातले जाते. पहिले नहाण पहिल्या दिवशी अर्धांगिनी धारण केल्याच्या प्रीत्यर्थ महादेवाच्या नावाने असते, तर दुसऱ्या दिवसाचे दुसरे नहाण गोत्रातील इष्टदेवतांच्या स्मरणार्थ असते. सालईचे झाड सदैव हिरवे असते त्याप्रमाणे वधूवर सदैव सुखी व चिरायू होवोत, अशी परधानांची भावना असते. या नहाणालाही "नहानोरांग" असेच म्हणतात. 'नहानोरांग'ची विशिष्ट पद्धत असते. ती अशी :

पटांगणात समांतर जोडीने दोन दोन फाटे ठेवण्यात येतात. एका फाटयावर समसंख्य गोत्रसंचातील विवाहित जोडपी बसतात आणि समोरील फाटयावर विषमसंख्य देवाच्या गोत्र-संचातील विवाहित जोडपी रांगेत बसतात. मध्य भागात नवरी किंवा नवरदेव बसतो. त्याच्या दोन्ही बाजूंनी





पाण्याने भरलेली भांडी रांगेत ठेवण्यात येतात. सर्वप्रथम समाजातील प्रतिष्ठित जोडपे वधूस किंवा वरास पाणी घालते. दोघेही आपापली डोकी नवरदेवाच्या डोक्यावर ठेवतात. सुवासिनी त्या सर्वांच्या शिरोभागी गाडग्याने पाण्याचा अभिषेक करते. याप्रमाणे प्रत्येक जोडपे वर/वधूस नहाण घालते. या कार्यक्रमात पुनर्विवाहित स्त्रीपुरुष भाग घेत नसतात. या कार्यक्रमात भाग घेणारे विवाहित स्त्रीपुरुष स्वतःला धन्य समजतात. त्या दृष्टीने ज्या ज्या वेळी त्यांना ही संधी मिळते त्या त्या वेळी त्यांचे पुनर्लग्नच होत असते, अशी त्यांची भावना असते. जो एकाच लग्नाच्या नवरीशी संसार चालवीत असतो तोच "नीत नवराल कुम्मेकार"चा अनुभव घेत असतो. परधानसमाजातील हा एक अत्यंत महत्त्वाचा विधी आहे. या विधीत भाग न घेऊ शकणारा पुरुष किंवा स्त्री करंटे मानले जातात. नवरदेवाच्या सामुदायिक नहाणाच्या वेळी खालील लग्नगीत म्हणतात–

जातीरो बाती रिय्योना समिया पती लाता दे।
हे लाडी समिया पती लाता दे।
(अमुक ढेक्या) रिय्योना समिया पती लाता दे।
हे लाडी समिया हुळीले वायेनी दे ॥
समिया पतान नेटी लाडा नावोर बाबो रांगानूर।
हे लाडा नावोर बाबो रांगानूर।
निवोर बाबो रांगाना नेटी जोडा घडींग वाटीका दे।
हे लाडी समिया हुळीले वायेनी दे ॥
समिया हुळाले वायान नेटी नावा आवाल रांगाल रो।
हे दुलेरा ! नावा आवाळ रांगाल रो।
नीवा आवाल रांगान नेटी लाडी घोडा गाडींग तातीका।

हे लाडी समिया पती लाता दे ॥
हे लाडी समिया हुळाले वाळा दे।
दे लाडी ओरीते उदाले वळा दे।
ओरीते उदान नेटी दुलेरा नावोर तम्मू रांगानूर।
निवोर तम्मू रांगान नेटी कोडा सिंगरू तातीका दे।
हे लाडी समिया पती लाता दे।
वाळा ते लाडी वाळा दे पिची सोकाले वळा दे।
हे लाडी पिची सोकाले वळा दे।
पिची सोकान नेटी दुलेहा नावा तंगे रागाले।
हे दुलेहा नावा तंगे रांगाले।
निगा तंगे रांगान नेटी सारी खागोरा सीका दे।
हे लाडी समिया हुळाले वाळा दे।
वळा लाडी वाळा दे येर तोरीले वाळा दे।
इमे धोती का सियाले वाळा दे।
हे लाडी समिया हुळाले वाळा दे ॥
धोती सियान नेटी दुलेहा भवा सेलाल रांगाल दे।
हे दुलेहा नावा सेलाल हुळाल दे।
निवा सेलाल रांगान नेटी चोई दिकळी तातीका दे।
हे लाडी समिया पाती लाता दे।
काऱ्याले नूले पांढरी नूले लाडी।
आगेने रिय्योना राहुटी दे
हे लाडी राहुटी हुळाले वायेनी दे।
राहुटी हुळान नेटी दुलेहा इचक्या ढेक्या रांगानूक
हे दुलेहा इचक्या ढेक्या रांगानूक।
इचक्या ढेक्या रांगान नेटी गोना गमडींग वाटीका
हे लाडी समिया हुळाले वाळा दे ॥

"कोण्या तरुणाची ही यौवनरूपी समई जळत आहे? (अमुक गोत्रातील) त्या तरुणाची ही यौवन-समई जळत आहे. हे प्रिये ! तू हे यौवन-दीप बघायला ये.

समई जळण्याच्या दिवशी हे प्रियकरा ! माझे वडील रागावतील. हे तरुणा ! माझे वडील शिवी-गाळ करतील. अगं ! तुझे वडील रागावतील. त्या दिवशी मी पायघड्या टाकून तुझ्या वडिलांचे स्वागत करीन. पण तू ही समई बघायला ये.

समई बघायच्या दिवशी हे प्रियकरा ! माझी आई मला रागावेल. तुझी आई रागवील त्या दिवशी मी घोडागाडी आणीन व तिचे स्वागत करीन. पण तू समई बघायला ये. समईरूपी माझे मन जळत आहे. तू येऊन ते शांत कर. हे प्रिये, तू हा जळणारा दिवा पहा. हे प्रिये ! माझ्या पंक्तीत बसायला ये. पण हे प्रियकरा ! (नहानोरा) पंक्तीत बसण्याच्या दिवशी माझा भाऊ मला शिवी देईल. तुझा भाऊ शिवी देईल त्या दिवशी मी शिंगरू–घोडे पाठवून त्याचे स्वागत करीन. पण हे प्रिये ! तू ये; येच. मला हळद लावायला तरी ये. परंतु हळद लाव-ण्याच्या दिवशी माझी वहिनी मला शिव्या देईल. हे प्रिये ! तुझ्या बहिणीकरिता मी सर–साखळी व खागोरा पाठवून देईन. पण प्रिये, तू या जळत्या दीपाला शांत करण्यास ये. अगं प्रिये, तू मला आंघोळ








घालायला तरी ये. मला धोतर देण्याकरिता तरी ये. आणि ही यौवन-समई बघायला ये. हे प्रियकरा! आंघोळ घालण्याच्या दिवशी माझी बहीण मला शिव्या देईल. ती मला पाहून रागवेल. तुझ्या बहिणी करिता मी चोळी-लुगडी पाठवून देईन. पण हे प्रिये तू हा यौवनदीप शांत करण्याकरिता ये!

हे प्रिये काळे धागे आणि पांढरे धागे ह्यांच्या बंधनांनी बांधलेल्या राहुटीमध्ये माझा मुक्काम आहे. माझी राहुटी पाहण्याकरिता तरी तू ये.

हे प्रियकरा! तुझी राहुटी पहायला येताच समाजामधील लोक मला अद्वातद्वा बोलतील. उगीच बदनामी होईल. हे प्रिये! लोक चर्चा करतील त्यावेळी मी तडव घोंगडी टाकेन व त्यांना बसवून त्यांचा मान-पान करीन. पण तू कसेही करून ये. हा यौवनदीप जळत आहे."

"नहानोरांग"च्या वरील गीतात सारा परधान-समाज अगदी तल्लीन होऊन या गीताची रुची लुटतो. लहानथोर स्त्री-पुरुष अगदी गर्क होऊन डोलत असतात. प्रत्येक लग्नगीतांची चाल, ताल व गती अगदी भिन्न असते. प्रत्येक गीतावर वेगळी मोड घेऊन स्त्रिया नृत्य करतात व ढोलक्याही ढोलाची वेगवेगळी बजाई करतो. अशा प्रकारे लग्न-सोहळयाची ही दुसरी रात्र कधी निघून जाते याचे भानच रहात नाही.

## तिसरा दिवस : वरबोधन

लग्नसोहळयाच्या तिसऱ्या दिवशी वधूवरांना आंघोळ घालून त्यांना मिष्टान्न चारतात. नंतर नवरी किंवा नवरदेवाच्या सभोवार परधानस्त्रिया गोलाकार बसतात आणि आत्या, मामा, काका, चुलता, भाऊ, बहीण किंवा इष्ट मित्रांच्या स्तुतिपर आठवणी सांगणारी गीते म्हणतात. या गीतांतून वधूवरांना आपल्या बालपणीच्या जीवनाची पूर्ण अनुभूती मिळते व शेवटी त्या निरलस आनंदमय जीवनाला आता आपण मुकणार या कल्पनेने वधू किंवा वर ती गीते ऐकून व्यथित होतात. या गीतां-तून वधूवरांना आपली संस्कृती तसेच सामाजिक शिष्टाचार ह्यांची जाणीव दिली जाते आणि उप-देशबोधनदेखील केले जाते. म्हणून या सामुदायिक लग्नगीतांना "बोधे किमाळ" असे म्हणतात. वराला बोधण्याची काही गीते खालीलप्रमाणे आहेत. वर आपल्या आईस विचारतो—

जाती वो बाती मियानी याया।
जाती ( अमुक ) याया।
अवो निवाते सेळोमी वेहा वो।
भलो ते वेहा बुरोते वेहा।
बत्ताल कटघातून हले घडमी।
पहाना कटचातून हले सेडमी।
निवासेडोमी वेहावो॥
बती नीळ सेडोमी वेहका बेटा कुवारा?
सेडोमी मुच्चुके जलमा वो या या?
जयते वंजेर खांड नावे याया नी।
पळोके तल्लातो येतीका वो।
निवासेडोमी वेहा वो॥
आगास आंदूर बाबो का रो कुवारा।
धरतरी आंदे आबाल बेटा कुवारा।
धरतरी झेले किता रो नावे कुवारा।
निवा सेडोमी कंजारो

"अग आई! तुझे कूळ-गोत्र कोणते आहे? (माझ्या दूध-गोत्राची ओळख दे.) तू (अमुक) त्या गोत्राची लेक आहेस. मग तुझे कूळमूळ आणि उत्पत्ती कशी झाली ते सांग. चूप का आहेस? भल्यानं तरी सांग किंवा वाईटानं तरी सांग, पण तो उगम मला सांग? उन्ह न घेता हे लाकूड वाळले कसे? आतून ओलसरा असल्यावाचून या ओल्या झाडाची (लाकडाची) वाढ तरी झाली कशी? धराण्याविना मी जन्माला आलो कसा? हे आई, तू याचा उल-गडा करून सांग. हे आई! कूळमूळ असल्याशिवाय कोणाचा जन्मच होऊ शकत नाही. (तू चूप का आहेस?) तुझी जीभ मी या कटचारीने कापून घेईन. नाही तर तुझा हा आताच शिरच्छेद करीन. तू बऱ्या बोलाने मला या गोष्टीचा उलगडा करून सांग." त्यावर आई सांगते: "याचा इतिहास काय सांगू बेटा कुमारा, हे आकाश ह्या सृष्टीचा नी आपला सर्वांचा पिता आहे आणि ही धरित्रीमाता आपणा सर्वांची आई आहे. अरे बेटा कुमारा! तुलाही याच धरित्रीमातेने झेलून घेतले आहे. हे तुझ्या कूळमूळाचे गुह्य ऐकून घे."









पुढील एका बोधगीतात वरमुलगा आपल्या वडिलांकडून आपल्या इष्टदेवता व कुळगोत्र ह्यांची माहिती करून घेत आहे.

" रेरेना, रे रे ना, बाबोरे, होरे का बोरे बी बाबो?
रेरेना, रेरेना, बाबोरे; होरे का (अमुके) बी बाबो।
निवे तो कोराते कुवाराना बाबोरे ।
निवोरे फुलभोगी मरी रे।
रेमीते निलतोना जवानीते वातोना ।
केयाटे मिवोरे पाटाळीन बाबा रे ।
दादाना उदीकाने कुतुडे ।
पाटाळी उदानूरे बिळाते ।
भीडीरे चावडी तारानूर पाटाळी ।
तयी अना बाबोला पुंदीका ।
सातीके मंदानूंगे रामगडे ।
पेनूके मंदानूंगे जामगडे ।
जंगो लिंगो हिंराजोती सेडोमी कुवारा ।
तई इमे कुवाराना पुंदीकी ॥
रे रे ना रेरे ना बाबो रे होरे का ( अमुक )
बी बाबो रे ॥ "

–" रे रे ना, रे रे ना ... " असा आलाप घेत हे गीत म्हणतात. या गीताचा खालीलप्रमाणे अर्थ आहे–

" सुखस्वप्ने पाहणाऱ्या पित्या ! तू कोणत्या घराण्यात जन्म घेतलास ? तुझे कूळमूळ काय आहे ते मला सांग ( माझ्या बीजगोत्राची मला माहिती दे). तुझ्या उदरात मी जन्म घेतला आहे. तुझ्याच मांडीवर खेळता खेळता मी हा एवढा वाढलो आहे. आज मी तारुण्याच्या उंबरठ्यावर उभा आहे. मी पूर्ण जवान झालो आहे. ( तरी तू आपले डोळे का लावलेस ? ) बोलवा तुमच्या भाटाला. मी त्याच्या समोर पाट मांडून बसेन व भाटाला त्याच्या पोथी-गाथ्यांच्या पसाऱ्यात बसवीन. मग तो भाट माझ्या वंशाची आणि कुळामुळाची उकल करून सांगेल. ते सर्व ऐकल्यावर मला बोध होईल."

वडील सांगतात, " हे कुमारा ! सात सतींची रामगडला प्रतिष्ठापना झालेली आहे. आपल्या कुलदेवता जामगडला आहेत. हे कुमारा, जंगो, लिंगो, हिराज्योती ही या समाजाच्या वंशाची व गोत्रांची मूळ दैवते होत. हे तुझ्या कुळामुळाचे रहस्य आहे. आता तू संतुष्ट हो. तुझे घराणे उच्च आहे. "

नवरदेवाप्रमाणेच नवऱ्यामुलीच्या सभोवताली स्त्रिया बसतात व तिलाही बोधगीतांच्या माध्यमातून " बोध " करतात. खालील लग्नगीतात प्रथम उपवर असलेल्या परधानी मुलीच्या आईचे व नंतर त्या मुलीचे भाव व्यक्त झालेले आहेत.

रेऽरेऽऽना, रेऽरेऽऽना नावे दाऊ ।
बोरे तो आंदूरे नावे बाई नोरे दाऊ ?
सिरी तो भगवाने नावे कुवारीनोर दाऊ ।
धारतेरी आवाले नावे कुवारीना दाऊ ।
बोरे तो आंदूरे नावे बाईनोर पेपी ।
राजा का कर्णालि नावे बाईनोरे पेपी ।
इंजिकूने सारा कारे दाऊ निवे रोने का बाबोला ।
अना हुंदाका ते रपो रे सुकारे का बाबोला ।
रंढे दियाना अना पोहोनेना बाबोला ।
दुसरोना रोता रे सिंगारे अना बाबोला ।
रोने तो हाकारे सिंदीरे बाबोला
रचाडाळे होकारे सिंदाने बाबोला
रेऽरेऽऽना रेऽरेऽऽना रे नावे बाबोला

" माझ्या लाडक्या मुलीचा कोण बरे पिता आहे ? सृष्टीचा आधार जो भगवंत आहे तोच या लाडकीचा पिता होय आणि धरित्री माता आई होय. हे बाळे ! तुझा मोठा बाप कोण आहे बरे ? राजा कर्ण हाच तर तुझा मोठा बाप आहे. (तू फार उच्च परंपरेतील पोरगी आहेस.)

हे बाबा ! मी उच्च घराण्यातील भाग्यवंताची मुलगी आहे, म्हणूनच का माझ्याकरिता तुझ्या घरात दुष्काळ पडलेला आहे ? आणि मी सासरी गेल्यावर तुझ्या घरी सर्व गोष्टींचा सुकाळ होणार आहे ? हे बाबा ! तुम्ही (उगीच वर वर जीव लावता) कशाला मला विटला ? बाबा मी दोन दिवसांची तुमची पाहुणी आहे. मी तर दुसऱ्या घरची शृंगारवस्तू आहे. मी तुमच्या घरी होते तेव्हा तुम्ही मला वारंवार घरातून हाका मारीत होतात व मीही अंगणाबाहेर कुठेच जात नव्हते व तुम्हाला " ओ " असा आवाज देत होते. (आता बाबा ! तुम्ही कोणाला वारंवार हाका माराल ? ) "

अशी अनेक गीते असतात. संपूर्ण दिवस आणि रात्रभरही ही गीते म्हटली, तरी ती संपत नाहीत. या

अनुक्रमणिका

गीतांतून केवळ वधू-वरचं नव्हे, तर संपूर्ण परधान-समाजाला नवा उजाळा मिळतो. त्या सर्वच दृष्टीने ही लग्नाची बोधगीते अत्यंत महत्त्वाची आहेत.

### चवथा दिवस

परधान जमातीत चार ह्या संख्येला फार महत्त्व आहे. चार लोक, चार चौघे, चार गोष्टी, चार तत्त्वे, चार भिंती, चार कोपरे आणि चौकोनदर्शक चार दिशा इत्यादी 'चौके' शब्द परधानवंशाची मूळ दैवते जंगो, लिंगो, हिराज्योती व मानको या चार इष्ट देवतांनी पवित्र करून ठेवलेले आहेत. त्याही दृष्टीने लग्नसोहळ्यातील हा चौथा दिवस म्हणजे परधान-समाजाकरिता पवित्र दिवस होय. त्या दिवशी कुटुंबातील कोणतीही व्यक्ती परगावी वा परदेशी गेली असली तरी घरी यायलाच पाहिजे, असा दंडक आहे. चार तत्त्वांचा जीव बनलेला आहे, असे त्यांचे तत्त्वज्ञान आहे. तसेच घरातील चार जीव एका दिलाचे पाहिजेत असा त्यांचा आग्रह आहे. या चौथ्या दिवशी चार चौघे म्हणजे संपूर्ण समाज लग्नमंडपात जमतो व सर्व सामाजिक विधी मोठ्या थाटाने साजरे करतो.

लग्नसोहळ्याचा चौथा दिवस उगवताच परधान-समाजातील स्त्रिया आपापल्या घरचे सडासंमार्जन, स्नान व स्वयंपाक आटपून घेतात. आणि शेजाऱ्या-पूर्वी नवरदेवाला किंवा नवऱ्या मुलीला आपल्या घरी आंघोळ घालण्याकरिता आणण्यासाठी स्पर्धा करतात. त्यांस आंघोळ घातल्यावर जमलेल्या मुलांमुलींना व स्त्रियांना गव्हाच्या " पेंडा गौनांग " वाटतात. तसेच नवरा-नवरीला रांगोळी वगैरे टाकलेल्या जागेवर बसवून त्यांस गोडधोड चारतात. याप्रमाणे समाजातील प्रत्येक व्यक्तीच्या घरी नवरी किंवा नवरदेव पूर्ण दिवस फिरतो. आज दिवसभर त्यांस मांडव पाहणे वर्ज्य असते. आजच्या दिवशी नवरा किंवा नवरी लपवून ठेवण्याची प्रथा असते. संध्याकाळी लग्नमंडपात वधूला किंवा वराला शोधून आणावे लागते. शोध न लावल्यास सोयऱ्यांना दंड द्यावा लागतो.

वधूला किंवा वराला लग्नमंडपात आणल्यावर त्यांना सामुदायिक नहाण घालण्याची तयारी करण्यात येते. या नहाणापूर्वी नवरदेवाची " दाढी आंजमाळ " नावाचा एक विधी आटोपण्यात येतो.

बोहल्यावर नवरदेव बसतो. एक सोयरा नवर-देवाची दाढी करतो. नवरदेवाच्या दाढीचे केस त्याच्या सभोवार आपापले पदर पसरवून बसलेल्या त्याच्या चार बहिणी ( बहिणी नसल्यास त्याच्या बीज गोत्रातील सुवासिनी ) आपल्या पदरात वेचतात. यालाच दाढो आंजमाळ म्हणतात.

त्या वेळचे गाणे असे–

" दाडी आंजाले वळा बाई बेहोना[४] ।  
निवा दाडीका आंजीका दादा ।  
बती दायोजो सीकी रो ।[१]  
मुळा दायोजो सिका नावे बेहोना ।  
एळमी दायेजो सीकाहो ।  
दाळी आंजीले वळा बाई बेहोनो[१] ।  
ढोरकी मियाळे इंदानूके दादा ।  
म्हसकी मियाळे इंदानूकेरो  
निवा दाडीका आंजीका दादा ।  
बती दायेजो सीकोरो ॥  
माटचा खागोरा सिका बाई बेहोना ।  
गुंड घगरा सीकाका हो ।  
दाळी आंजीले वळा बाई बेहोना[१] ।  
कसार मियाळे इंदानूके दादा ।  
सोनार मियाळे इंदानूके रो ।  
निवा दाळीका आंजीका दादा ।  
बती दायेजो सिकीन रो ।  
निवा रोनेतो वेहाबाई बेहोना ।  
निवा सरीते वेहकी हो ।  
निके अक्षिदांग सीकाबाई बेहोना ।  
नीके पुसे कीकान हो ।  
सर्ग हत्ता केरेता बाने ।  
ताने लगता खपरेल रो ।  
हद निवा बेहोनाना रोने ।  
नाके अक्षिदांगे सीकीन रो । "

" अग माझे ताई ! माझ्या दाढीचे केस तुझ्या पदरात घेण्याकरिता तू ये गं. माझ्या दाढीचे केस तुझ्या पदरात धर.

हे दादा ! मी तर तुझी दाढी " आंजायला " येईनच. पण तू मला काय ' दहेज ', काय आंदण देशील ?

अग ताई ! तुला एक गाय देईन. एक म्हैस आंदन देईन. पण तू माझी दाढी आंजायला ये.

अनुक्रमणिका

पण हे बंधो ! लोक मला गुराख्याची मुलगी समजतील किंवा माझ्या जवळची म्हैस पाहून मला म्हसक्याची लेक समजतील. मग तू मला काय आंदण देशील ?

हे ताई, तुला मी हातात माट्या गोलुट्या करून देईन. किंवा गुंड आणि तांब्याची घागर आंदण देईन.

पण हे बंधो ! चांदीचे दागिने पाहून लोक मला सोनाराची लेक समजतील व गुंड-घगरा पाहून मला कासाराची मुलगी समजतील. मग तू कशाचे आंदण देशील ?

मग हे ताई ! तुझे घर कुठे आहे, ते सांग. तुझ्या घराचा रस्ता सांग. म्हणजे मी तुला अक्षता पाठवीन आणि तुला सदैव विचारीत राहीन.

हे बंधो ! केळीच्या झाडाची एक शिळा स्वर्गात गेलेली आहे व त्यावर खपरेल आच्छादिले आहे. तेच माझे घर समज. तिथे अक्षता पाठव व या बहिणीची आठवण कर. "

दाढी आंजल्यानंतर वराला किंवा वधूला सामुदायिक नहाण म्हणजेच " नहानोरांग " घातले जाते. समाजातील सर्व विवाहित स्त्री-पुरुष (ज्यांची एकदाच लग्ने झालेली आहेत) वधूवरांवर आपल्या डोक्यावरून पाणी सोडतात. तेव्हा ते खालील गीत म्हणतात—

"तुम्हारे देसोमें लाडी हलदीका दुकार।
हमारे देसोमें लाडी हलदीका सुकार ।।
तुम्हारे देसोमें दुलेरा कुकूका दुकार ।
हमारे देसोमें दुलेरा कुकूका सुकार ।। "

" नहानीरे " संपताच सोयऱ्याच्या गळ्यात कोरा दुपट्टा बांधून त्याचे हस्ते " मुंडा " आणण्यात येतो. " मुंडा " म्हणजे मोहाच्या झाडाचा एक बोटभर फांदीचा तुकडा. मुंडा आणण्याकरिता केवळ पुरुषवर्ग जात असतो. अर्ध्या रात्री किंवा जेवणरात्री मोहाच्या झाडाची पूजा करावी लागते. नंतर सोयरा झाडावर चढतो. झाडाच्या बुंध्याला चारचौघे धरून ठेवतात. लग्नमांत्रिक झाडाचे बूड मंत्राच्या साह्याने पक्के धरून ठेवतो. या प्रसंगी विरुद्ध पक्षाचा कोणी मांत्रिक झाड साधून ठेवण्याची शक्यता असते. त्यामुळे सोयरा झाडावर चढताच झाड मुळासकट उलटून जाते असे म्हणतात. त्यामुळे हा विधी अत्यंत सावधानीने व मंत्रतंत्राच्या जोराने करावा लागतो. परधानसमाजाची कुलदैवते ही मोहाच्या झाडावर वास करतात, अशी श्रद्धा आहे. ती झाडावरून उतरवून मंडपात आणण्याकरितां मोहाची काडी म्हणजे 'मुंडा' आणण्याचा हा विधी असतो.

मुंडा घेऊन मंडपाकडे आल्यावर खालीलप्रमाणे गीत म्हटले जाते. एक अवघड गोष्ट करून परत आल्याचा आनंद त्यात असतो. परधानलोक आनंदाने नाचतात. कोणी दांडपट्टा, लाठीकाठी व कुस्त्यादेखील मंडपाजवळ येऊन खेळतात आणि नाचतात. ढोलवाजंत्रीचा गजर चाललेला असतो.

" जातीरो बाती रिय्योना, मुंडा वाया लाता ।
माहोरे नलेंज माहोता, ताहोरे नलेंज ताहोता ।
(अमुक) रिय्योना लाडीदे मुंडा वाया लाता ।

(चाल बदलवून)

दादाना जोडीते रिय्योर आखाडा डेहकी लातोरे
शिदरी मन तलाडोरे रिय्योर आखाडा डेहकी लातोर ।
मरका फोळींग कनकनोर रिय्योर आखाडा डेहकी लातोर ।
तेली मुंडांग कैंकनोर रिय्योर आखाडा डेहकी लातोर ।
शेतीमन कवकनोर रिय्योर आखाडा डेहकी लातोर ।
गाडा चाकूम.छातीतोर रिय्योर आखाडा डेहकी लातोर ।
गाडाघूर कालकनोर रिय्योर आखाडा डेहकी लातोर ।। "

अडामुडा डेहके बोर शिडोराल दे ।
अडामुडा डेहके (अमुक) शिडोराल ।

" कोणत्या गोत्राच्या तरुणाची कुलदैवते डोलत येत आहेत ? ( अमुक नवरदेव ) ह्या तरुणाची कुलदैवते येत आहेत. सूर्य-चंद्र एकवटून झाडावरून ही दैवते उतरवून आणलेली आहेत. ही दैवते त्या ( अमुक ) तरुणाची होत. "

" आपल्या भावाच्या जोडीनें आणखी कोण वीर तरुण आखाडा खेळत आहे बरे ? आखाडा खेळणारा हा तरुण डाल्याएवढ्या डोक्याचा आहे. सखी ! हा बघ, आंब्याच्या फोडीप्रमाणे टपोरे डोळे असणारा हा तरुण आखाडा खेळत आहे. घानीच्या








दांडयांप्रमाणे या तरुणाचे दांडगे हात आहेत. त्याचे कान सुपासारखे मोठे आहेत आणि तो आखाडा खेळत आहे. गाडीच्या चाकाएवढी छाती असणारा हा तरुण आखाडा खेळत आहे. गाडीच्या धुरा-एवढया पायांचा हा तरुण भराभर आखाडा खेळत आहे. पण हा अधेमधे आडव्यातिडव्या उडया टाकणारा हा वेगळाच कोण बहीताड होय बरे? अरे! हा (अमुक) तो बहीताड धोंडू उडया टाकीत आहे."

"मुंडा" आणल्यानंतर तो लग्नमंडपाला बांधून ठेवतात. त्याची यथाविधी पूजा होते. नंतर पंगत होते.

## गजमोती चौक लिखायो :

परधानसमाजात पाचव्या दिवशी लग्न लावतात; पण नवरीला किंवा नवरदेवाला चौथ्या दिवशी रात्रीच लग्नाचे कपडे चढवितात. वधूवरांना कपडे, आभूषणे चढविण्याचा त्यांचा एक विधी आहे त्याला ते "चाऊक उदमाळ" असे म्हणतात. चौथ्या दिवसाचे सर्व कार्यक्रम संपल्यावर वरात निघण्यापूर्वी नवरीला चाऊक बसवितात. सारविलेल्या जागेवर हळद, कुंकू व ज्वारीच्या पीठाची रांगोळी सोयऱ्यांच्या हस्ते टाकण्यात येते. त्यावर स्वच्छ पाट किंवा कोंद-णीची बनविलेली पाटी ठेवण्यात येते. त्यावर वधू किंवा वराला बसवून त्याला लग्नाची सर्व आभूषणे चढविण्यात येतात. नवीन वस्त्र परिधान केल्यावर वधू किंवा वर हातात अक्षता घेऊन त्या पाटावर उभे रहातात. सर्व आप्तेष्ट व इष्टमित्र एकेक येऊन वधू किंवा वराला अक्षता लावतात व वधू आप्ते-ष्टांना अक्षता लावून नमस्कार करते; तेही तिला नमस्कार करतात. सर्व लोकांना अक्षता लावून होई-पर्यंत वधू किंवा वर त्या पाटावरून उतरू शकत नाही. अक्षता लावणे झाल्यावर वधूला किंवा वराला पाटावरच मिष्टान्न चारतात व लगेच वरातीची तयारी होते. "चाऊक"संबंधी खालीलप्रमाणे लग्नगीते म्हटली जातात.

"काहेका चाऊक लिखायो बाबोला?[१]
गुल्याडा चाऊक लिखायो कानिया।
कमकाता चाऊक लिखायो कानिया।
चाऊके उदाले वाळा का कानिया।
गुल्याडा चौके उदोने बाबोला।
गुल्याले गुल्याले दिसीकां रे।
कमकाता चाऊके उदोने बाबोला।
कमकांगे कमकांगे दिसीकाने रे॥

पिंडीता चाऊक लिखायो बेटी कुवारी।
पिचीता चाऊक लिखायो का हो।
चाऊके उदाले बी वळा नावे कुवारी[२]॥
पिंडीता चाऊने उदोने बाबोला।
पिंडींगे पिंडींगे दिसीका रे।
पीचीता चाऊके उदोने बाबोला।
पीचिंगे दिसकाने रे॥

वळावळा हो वळा बाई सुरवां।
गजमोती चाऊक वाळतोना हो।
मुंगामोती चाऊक लिहीमाता सुरवा।
इमे चाऊके उदालेबी वाळा का हो॥

गजमोतींगे चाऊके उदोने का दाऊ।
अना गजम्याले गजम्याले दीसीका रे।
मुंगा मोतीना चौके उदोने रे दाऊ।
अना मुंगांगे मुंगांगे दिसिकान रे।

कुकूता चौके उदा नावे सुरवां।
कुकूंगे कुकूंगे दिसीका रे।
खागोरा जोळवी कराबाई कुवारी।
इमे चाऊके उदाले वळाका हो॥

अना जोळवी जुळवा करोनेका दाऊ।
खागोरा साकरीबी करोनेका रे।
बदे चाऊके उदोने का दाऊ।
अना चाऊके उदोने रे॥"

"हे बाबा! तू कशाचा चौक लिहून चितारला आहेस? हे माझ्या लाडक्या कन्यके! हा गुलाल व हळदीचा चाऊक लिहिलेला आहे. तू चौक बसण्या-करिता ये.

हे बाबा! मी गुलाल चितारलेला चौक बसत नाही, कारण मी गुलालासारखी रंगलेली दिसेन. मी हळदीचाही चौक बसत नाही, कारण मी हळदी-सारखी रंगलेली दिसेन.

हे बेटी कुमारी! मी भिजलेल्या हळदीने चौक रंगविलेला आहे आणि पिठाची रांगोळी टाकलेली आहे. तू चौक बसण्याकरिता त्वरित ये.








अनुक्रमणिका

हे बाबा! मी पिठाचा चौक बसत नाही, कारण मी त्याने पीठपीठच दिसेन. मी ओल्या हळदीचाही चौक बसत नाही, कारण मी हळदहळदच दिसेन.

अर्थ, येगं येगं बेटी कुंवारी! मी गजमोती चौक शिंपलेला आहे. मुगामुहरांनी चौक सजविला आहे.

हे बाबा! मी गजमोती चौक बसत नाही, कारण मी गजम्यासारखी बाळवट दिसेन. मी मुंगामुहऱ्यांचाही चौक बसत नाही, कारण मुंगामुहऱ्यासारखीच मी दिसेन.

बेटी! कुंकवाच्या चौकावर बसायला ये.

पण बाबा! मी कुंकवारखी दिसू लागेन.

हे बेटी! तू खागोरा व जोडव्या घाल. रुसून बसू नकोस. त्वरित चौक बैस.

हे बाबा! मी जोडवीबिडवी मुळीच घालत नाही. मी खागोराबिगोरा काहीच घालत नाही. मी चौकबिवूक काहीच बसत नाही. मला याचे काहीच करावे लागत नाही."

नवरीप्रमाणे नवरदेवालाही "चौक" सजवून बसवीत असतात. त्याचे "चाऊक उदाना" गीत खालीलप्रमाणे—

"गजमोती चाऊल लिखायो बाबोला।
बालेतो बाले बिठाओ बाबोला।
गजमोती चौक तूने पुरायो।
बालेतो बाले बिठावो बाबोला।।"

"हे लाडक्या कुमारा! हिऱ्यामोत्यांनी चाऊळ सजवून बालोबाल तयार करून ठेवला आहे. तू केव्हाही चौक बैस."

नवरदेवाला कपडे चढवतानाही गीत म्हणतात.

नवरदेव चौक बसल्यानंतर त्यास सर्व समाजातील लोक अक्षत लावतात व नमस्कार करतात; तोही त्यांना नमस्कार करतो. त्या वेळी प्रत्येक आप्तेष्टाशी "लग्नेबुवा" नवरदेवास परिचय करून देतो. त्यास "मिठुसमाळ" असे म्हणतात. त्या वेळी एक लग्नगीत सुरू असते—

"होरे तो बोरे आयानूरे दाऊनोरे?
होरे तो (अमुक) आयानूरे दाऊनोरे।
होरे तो बोरे आयानूरे दाऊनोरे?
होरे तो आयानूर तादो ये।
होरे ते बोरे आतराम दादाले।
होरे ते आयानूर तमू ये।
होरे से बोरे मसराम दादाले।
होरे ते आयानूर येनाले।।
होरे ते बोरे गेडाम दादाले।
होरे ते आयानूर सगलाले।।



अर्थः— "तो कोण बरे तरुण कुमार पुत्र? तो त्या (अमुक) घराण्याचा तरुण कुमार आहे.

या तरुण कुमाराचे हे (नातलग) कोण आहेत?

हा (अक्षत लावणारा) तरुणाचा आजोबा होय.

तो कोण बरे आतराम दादा उभा आहे? तो या तरुणाचा (बीजगोत्राचा) भाऊ लागतो.

तो मसराम दादा तरुणाचा कोण लागतो?

तो या तरुणाचा (दूधगोत्राचा) मामेभाऊ लागतो.

हा गेडाम भाऊ त्या तरुणाचा कोण लागतो?

हा तर या कुमाराचा साळभाऊ लागेल."

याप्रमाणे प्रत्येक आप्तेष्टाचे नाव घेऊन या गीतात नवरदेवाचा परिचय करून देण्यात येतो व तसतसे हे गीत लांबत जाते.

नवरीस अक्षत लावण्याच्या वेळी तिचाही तिच्या आप्तेष्टांशी परिचय करून देण्यात येतो. त्या वेळी ती (त्या गीतात) त्यांना सांगते, की "तुम्ही मला कंटाळला होतात ना? आता मी तुमच्यावरील भार कमी करून दूर निघून जात आहे." या विधीस "शीग येतमाळ" असे म्हणतात. ह्या विधीच्या वेळी खालील गीत डबडबलेल्या अश्रूंनी महिला म्हणत असतात—

"शीगो तो लोभी भेयाले बाईनोरे[१]।
सब्बा चक्कीता शीगो भेयाना।
शीगो खाली आता।
बाई तो चाले, येना र मिवा शीगे।
शीगे तो येनवाले ह्याले।
अना शीगो तो वोय वाले हूले।
शीगो तो वोयाले इंदीर दाऊ।
परगाना वोयाले इंदीर रे।
रोनेका वोयाले इंदीर रे।
येनारे मिवा रोनेका दाऊ।
येनारे मिवा राचाका रे।
हुळाहे मिवा परगाना दाऊ।
बांगे तो वोयबाले ह्याले।"

अनुक्रमणिका








" हे मुली ! हा बघ ( शीग लोभी ) पैसालोभी तुझा भाऊ.

तुझ्यामुळे तुझ्या या भावाच्या धनधान्यात कमतरता पडत होती. हाच तुझा भाऊ आहे.

हे बंधो ! मी तर हे घर सोडून जात आहे. हे घ्या. तुमचे धनधान्य पहा. मला तुमच्याकडून तसूभरही शीग नको. मी तर शीग नेणारी नाही.

हे आजोबा ! मी 'शीग नेईन' असे तुम्ही समजत होतात. आणि हे बाबा ! मी तुमचे परगाणे नेईन अशी तुम्हाला धास्ती वाटत होती. तसेच तुमचे घर-अंगणही उचलून मी नेणार की काय, अशी तुम्हास चिंता वाटत होती.

हे पहा सांभाळा तुमचे परगाणे, हे सांभाळा तुमचे घर व अंगण. मी तुमच्याकडून काहीच नेणार नाही. "

गोंड परधानसमाजात नवरी हीच परणू जाते आणि नवरदेवाच्या मंडपात लग्न लागते. पूर्वी त्यांची लग्ने झाडाखाली लागत असत, असे म्हणतात. पाचव्या दिवशी सकाळी सूर्योदयाच्या वेळी लग्न लागले पाहिजे, असा त्यांचा कटाक्ष असतो. म्हणून नवरीची चौथ्या दिवशी रात्रीच वरात निघते. दूरची सफर असली, तर नवरी रस्त्यानेच आपले इतर विधी पूर्ण करीत निघते. पण पाचव्या दिवशी उषःकालाच्या वेळी ती वरमंडपात हजर झालीच पाहिजे, असा दंडक आहे.

नवरीची वरात निघताना खालील गीत म्हणतात : सुखाँ परदेस:–

नावा यायाले पालखीतेने ।
नावे दाऊ ये हौदातेने ।
नावा यावोने अळामनी सिमाटे वो,
शेजारीनबाई पाजारी ।
मैं सुखाँ चाले कोई पराऊदेस ॥
एळूंगे उकाळे दोहतोर वो नावे बाबोला मेरा ।
एळूंगे उकाके उंगताये वो नावे यायानी मेरा ॥
आजाने दोरी आटला ।
आजीने आफू चारला ।
माय धर्मांची दूध पाजली ।
बाप कष्टाने उदर भारीला ॥
एळूंगे मट्टाना सामटीते डिडाल ।
एळूंगे पेकीनोर बाबो डिडाल ।
नावा नसीबो दोहतोर डिडाल ।
मैं सुखाँ चाले कोई परदेस ।
नावा यावोन अळीमनी सिमाटे वो, बाई शेजारीन ।
नावा यावोन अळीमनी सिमाटे रे, बाई पाजारीण ॥ "

" माझी आई पालखीत बसली आहे. माझे बाबा अंबारीवर बसलेले आहेत. अग शेजारणी, अग पाजारणी ! माझ्या आईला रडू देऊ नको. मी कोण्या परदेशात जात आहे.

माझ्या वडिलांनी सात पाळणे माझ्याकरिता बांधले होते आणि त्या सात पाळण्यांत माझ्या आईने मला झुलवून झोपविले होते.

माझ्या आजोबांनी पाळण्यासाठी दोर आणला होता. माझ्या आजीने मला अफू चारली होती. धर्माच्या माझ्या आईने मला दूध पाजले होते. माझ्या वडिलांनी कष्टकमाई करून आमचे उदरभरण केले होते.

सात डोंगरांच्या खिंडीत कोणी डिडोबा राहतो. सात पिल्लांचा बाप तो डिडोबा. तो डिडोबा माझ्या नशिबी लागला आणि म्हणून मी त्या कोण्या परदेशाला चालले आहे.

अगं शेजारणी ! माझ्या आईला झुरू देऊ नको. माझ्या आईला रडू देऊ नको."

## पाचवा दिवस : कन्यादान

लग्नोत्सवाच्या पाचव्या दिवशी मोठ्या पहाटेस नवरीची वरात नवरदेवाच्या गावशिवेवर येऊन थडकते आणि तेथे वाजंत्री वाजवून गाणेही म्हटले जाते.

" यादोबा पालखी रोहारो । गुलामी हाजूर ॥
नावा यायाल वाया लता ॥
पालखीतांगे दांडागे उसंगतागे लाडी ।
ये नावे बेगम सुखाँ दे[२] ॥
निवा अळाने सिमे वाडेन रो । गुलामी हाजूर ॥
दांडांगे सुधरे कीमे रो ।
यादोबा, पालखी रोहारो । गुलामी हाजूर ॥
नावा यायाल वाया लाता ॥
पालखीतांगे नालके नमतांगे लाडी ।
ये नावे बेगम सुखाँ दे ॥
निवा सेलाने सीमे खातीनं रो ।
गुलामी हाजूर ॥
नालके सुधरे कीमे रो ॥

अनुक्रमणिका







यादोबा, पालखी रोहारो। गुलामी हाजूर॥
नावा यायाल वाया लाता॥
विताट भेयारे, बाईना साखरी तुरता।
विताट बाई विताटे, बाईना जोडवी तुरता॥
बाईना चालेमातोना भेयारे।
भेया बाईना अहूनें चाले मातोना॥"

"अरे कोणी गुलाम हजर आहे काय ? त्या यादोबाजींना पालखी पाठवायला सांगा. आमची राजकन्या येत आहे.

पण हे राजकन्ये ! पालखीचे दांडे मोडून गेले आहेत. मग, यादोबाच्या ( नवरदेवाच्या ) आईला सुताराच्या घरी गहाण ठेऊन त्याच्या करवी दांडे दुरुस्त करायला सांगा. आणि ही बेगम येत आहे. तिच्याकरिता कोण्या गुलामाकरवी पालखी घेऊन या.

पण पालखीचे बाले व नाल तुटलेले आहेत. तर मग त्या यादोबाच्या बहिणीला लोहाराच्या घरी ठेऊन त्या लोहाराला नाल दुरुस्त करायला लावा- ही बेगम येत आहे. तिच्या करिता त्वरित पालखी पाठवा.

अरे दादा ! धाव रे, माझ्या गळ्यातील सरी-साखळी तुटून पडली आहे. अगं ताई ! धाव धाव, माझ्या पायातील जोडव्या खाली पडल्या आहेत. मी बाई तशीच चालले आहे. हे बंधो ! मी तशीच निघाले आहे."

हा पाचवा दिवस अत्यंत धूमधडाक्याचा असतो. हर्षाखुषीचा नी आनंदाचा असतो. वधूपक्षाकडील आणि वरपक्षाकडील सर्वच पाहुणे आज लग्न-मुहूर्तावर उपस्थित होत असतात. आजचा दिवस जणू परधानांची यात्राच असते. गावशिवेवरनं नव-रीची वरात मंडपाजवळ गाजावाजा करीत येते. मंडपाजवळ वरपक्षातील मंडळी स्वागत करण्या-करिता उभी असते. प्रथम नवऱ्यामुलीचे पाय ताटात धुण्यात येतात व नंतर नवरीच्या वराती-मधील सर्व मंडळींचे पायधुणे करतात. रामरामी झाल्यावर वरातीला जानोसा दिला जातो. वरात आल्यावर दोन्ही पक्षांतील महिला एकमेकांवर गाणी म्हणतात. ही सर्व गीते शृंगारिक, मनोरंजक आणि काही अश्लीलदेखील असतात. वधूपक्षाकडील महिला लग्नमंडपाजवळ आल्यावर खालील गीत म्हणतात-

"जलदी पसिया भाभी जलदी पसिया दे।
अना वरोनाए बावऱ्याना वातोना दे[२]।
मनी मकमा भाभी मनी सोडिमा दे।
अना चौधाऱ्याल सोटा अरी वातोना दे[३]।
मनी वरीमा भाभी मनी वरीमा दे।
अना निवोर मिजवान वातोना दे[१]।
जलदी पसिया भाभी..."

"हे भाभी, हे संगो ! घराबाहेर लवकर लवकर ये. मी तुझा "बावरा." आलो आहे.

अग संगो ! मला पाहून लपू नको, पळू नकोस. अगं, तुझ्याकरिता मी चांगला चौधारी सोटा आणला आहे. अगं वहिनी ! नको भिऊ. मी तुझा पाहुणा आलो आहे. अगं भाभी ! लवकर घराबाहेर ये."

याचवेळी नवरदेवाकडील स्त्रिया खालील गीत मोठ्या त्वेषाने म्हणतात आणि त्यांच्या गाण्याची तोड करतात. लग्नगीतांची ही जणू स्पर्धाच चाललेली असते.

"ढोढांग मट्टांग वाती हो। साले कायांग विति हो॥
बोना पोहराता येर, उट्टीदरे भाभी दरे।
नावा पोहराता येर, उट्टी दरे भाभी दरे।
येर सेहोरे माता दे॥
निवा पटवान जवान अना वातोना, हो दरे भाभीदरे।
नाके बिछोना वाटा दरे भाभी दरे।
कल निट्टीची सीम दरे भाभी दरे।
काल सेहोरे माता दे॥"

"अग संगो ! डोंगर खाडीतून पळत आलीस. येताना सालईची कच्ची फळे खात आलीस. आणि तहान लागली तर कोणाच्या पोहऱ्यातील पाणी प्यालीस ? मी जवानाच्या पोहऱ्यातील तू पाणी प्यालीस. माझ्या घरचे पाणीच तुला संचारले आहे.

अगं भाभी संगो ! मी तुझा खमीठोक जवान आलो आहे. माझ्याकरिता पलंग बिछाई करून करून दे. आणि हे संगो, मला दारूचा प्याला भरून दे. मग दारू कशी संचारेल ते पहा."

लगेच वरील गीताला प्रतिसाद खालील गीताने मिळतो-

"ठाठोरो बंगला बोना रो? हे बापुरो। हे राजा रो।
ठाठोरो बंगला होना रो।
बंगला हुळशी रयतोना दे। हे रानी दे। हे लाडी दे।
बंगलात परो नावा टंगला दे।
बंगला हाल जीता दे।
हीद बंगला बहादूर होना दे।...."

"शृंगाराने नटलेला हा बंगला (प्रेयसीचे शरीर) कोणाचा बरे आहे? हे राजा! हे बाबू!! हा बंगला कोणाचा आहे? बंगला पाहूनच मी येथें उतरलो आहे. हे प्रिये! हे संगो! तुझ्या बंगल्यावर माझे पाय ठेऊ दे. पण हा बंगला रंगेल आहे ना! हा बंगला या बहाद्दूराने आता काबीज केलाच समज."

"मियानिगे बोर बोर वासीरो लेळटुळा।
मियान इमे बोर बोर वासी।
मियानिगे हुटूमे वासी रो पाळाटुळा।
मियानीगे ढोकूमे वासी।
मियानिगे म्हसोबाळ वासीरो पाळाटुळा।
मियानिगे गधळचाले वासी।.."

"अरे परधानाच्या पोरा! तुझ्या वेळी तुझ्या आईजवळ कोण कोण आला होता? अरे तुझ्या वेळी तुझ्या आईजवळ उंट आला होता. आणि हे बघ ढोकही आला होता. तुझ्या आईजवळ म्हसोबाही आला होता आणि गधोबादेखील आला होता. (म्हणून तु बावळट जन्मलास.)"

"विदाऊना भर्राल मुचे भर नेकी लाता" म्हणजे "तुझ्या वडिलाची मातीची येळपी भरभर वाजत आहे" या अर्थाचे लग्नगीत म्हणून त्याला प्रत्युत्तर दिले जाते. शेवटी "एल्ली साता। वास वाता। ढांग्याना रोन। जानोसा" म्हणजे "उंदीर मेला। दुर्गंधी सुटली। ढांग्याच्या घरी। जानोसा." असे म्हणत वरपक्षाकडील मंडळी व महिला मंडपाकडे निघून जातात. तसेच वधूपक्षाकडील सर्व मंडळी त्यांना दिलेल्या जानोसाघरी जातात.

वराच्या मंडपात लग्नाची तयारी सुरू असते आणि महिला गीते म्हणतच असतात.

"यायावो याया इंदानूर दादाले।
बदे तरी यायाने मूटानूर दादाले।
बचोडा सामाँ निवा आता यायावो[1]?
सव्वा खंडीता सामाँ निवा आतारो बेटा[2]।
नावोर कुवारानी रो॥
दामोका जोडचाना मियानी याया वो।
इमे दायो जोडे किती याया वो।
नीकून कोळचाल तीका वो॥ यायावो ...
दवडो रे दवडो बेटा वराद देखो रे।
वराद क्या देखूवो माँ फौज फाटा वो॥
आते तो आनेदेव मैं देनेवाली खडी।
नावोर दुलेहा। मैं देनेवाली खडी।"

"आई! आई!! असा हाकाहाक करीत हा तरुण घरामध्ये गजर करीत आहे. आईपुढे त्याचा कोण आकान्त आहे!

हे आई! लग्नाकरिता तू किती सामान जमविले आहेस? किती धान्य गोळा करून ठेवले आहे?

अरे लाडक्या कुमरा! सव्वा खंडीची पूर्ण भरती मी करून ठेवलेली आहे. तू काही अनमान करू नको.

हे आई! तू खरोखर दाम जोडणाऱ्याची लेक आहेस. तू (कवडी कवडी) दाम जोडून 'सामाँ' करून ठेवलीस व तू तुझ्याकरिता सून आणलीस.

हे बेटा! (उगीच गोष्टीत वेळ गमाऊ नकोस.) जा पळ. वरात आली वाटते, तो पहा.

अगं आई! मी वरात काय पाहू? तो तर फौजफाटाच आहे.

अरे, येते तर येऊ दे. मी वरातीची सरबराई करायला इथे उभी आहे ना."

"दवडोरे बेटा दवडोरे, हात पकडो रे[3]।
बिरानेकी बेटी ओ माँ,
कैसे हात पकडू वो?
हातो का तो दाम दिया,
हात पकडो रे।
पावो का तो दाम दिया,
पाव कूदो रे।"

मायलेकाचा संवाद चालला असतानाच, जानवसा घरून नवरी लग्नमंडपात येते. सुरुवातीला नवरीची मंत्राने भारलेली बंद मूठ नवरदेव एका हाताने सोडतो. नवरदेवाच्या बोटातील लोखंडी अंगठी तो नवरीच्या बोटात घालतो. नवरीला कटळी पोत बांधतो. नवरीच्या पदराला नवर-








देवाच्या शेल्याची गाठ बांधण्यात येते. नवरदेवाची परीक्षा घेणारे विधी आटोपण्यात येतात. अनेक परीक्षांत नवरदेव यशस्वी झाल्यावर त्यांचे लग्न लावण्यात येते. अन्यथा लग्न तुटतेही. परधान-समाजातील ही वरपरीक्षापद्धती म्हणजे स्वयंवर-पद्धत म्हटली पाहिजे. कारण स्वयंवरणे हे परधानांच्या "लमजाडे" म्हणजे "घरजावाई" ठेवण्याच्या कल्पतेशी जुळते आहे. त्यांच्यातील या स्त्रीविधिप्राबल्यामुळे परधानसमाजात प्राचीन काळी मातृप्रधान कुटुंबपद्धती असावी असा तर्क करायला वाव आहे.

**कन्यादान**

मंडपात सर्व समाज बसलेला असतो. त्याच्या-पुढे लग्न लावणारा "लग्न्या" वधूवरांचे लग्न लागल्याचे जाहीर करतो. लोक ज्वारीच्या अक्षता फेकतात. त्यावेळी महिला खालील गीत म्हणतात. हे गीत म्हणजे परधानांच्या लग्नाचे "लग्नपंचकच" म्हटले पाहिजे–

मादाऊ वांदूर लाडी सावलीतेधे उदनूर दे।
तरहूर कन्या दान ॥ १ ॥
मी दाऊ वांदूर लाडी, धडमी तेनें उदनूर दे।
गांजा घोटे किंदूर दे, तरहूर कन्या दान ॥ २ ॥
मी दाऊना नळीदे लाडी उल्लींना गंगडी दे।
मादाऊना नळीदे लाडी, सोनोतांगे कमडी
नीक मैसी तत्तूर दे, तरहूर कन्या दान ॥३॥
मी दाऊ पैसा लोभी नीक हारे मातूर दे।
मी दाऊ गांजाखसी ह्रीवूड नेली उदनूर दे।
तरहूर कन्या दान ॥४॥
सुनो नर्मदा सुनोरे गंगा। सुनो नगरीके लोकदे।
नीवा कय नावा कयदे, तरहूर कन्यादान ॥५॥

"माझे वडील येत असत तेव्हा ते सावलीतच बसत असत. (शुभ मंगल सावधान या अर्थाने) तरहूर कन्या दान ॥१॥

हे प्रिये! तुझे वडील येत असत तेव्हा ते उन्हातच बसत असत व नेहमी गांजा घोटीत बसत असत. तरहूर कन्या दान ॥२॥

हे प्रिये! तुझ्या वडिलांच्या कमरेत कांद्यांची सळ बांधलेली दिसत असे. पण माझ्या वडिलांच्या कमरेत सोन्याच्या कमड्या आहेत. म्हणून तुला जिंकून आणलेले आहे. तरहूर कन्या दान ॥ ३ ॥

हे प्रिये! तुझे वडील पैशाचे लोभी आहेत. म्हणून तुला ते हरले. तुझे वडील गांजेकस आहेत. ते नेहमी काटेरी हिवराच्या झाडाखाली बसत असत. तरहूर कन्या दान ॥ ४ ॥

तू ऐक हे नर्मदा माते! आणि हे गंगामाते! आणि तुम्ही नगरातील सर्व लोक हो! (तुम्ही साक्षी आहा) तुम्ही ऐका, या प्रेयसीचे हात आता माझ्या हातात आहेत. तरहूर कन्या दान ॥ ५ ॥"

लग्न लागताच बोहल्याभोवती नवरदेव, नवरी, लग्नेबुवा, लग्नेबाई व दोन सुवासिनी (घट धरणाऱ्या) इतकी मंडळी सार धरून वेढे मारतात. नंतर लग्नेबुवा मंडपाच्या वेगवेगळ्या खांबांना वेढे देऊन मंडपात फिरतो. त्याच्या पाठोपाठ सार धरणाऱ्या प्रत्येकाला फिरावे लागते. धावपळ करताना ज्याची करंगळी निसटून हात सुटतो तो हरला असे मानून बोहले फिरणे संपवतात. त्याचे गीत असे –

"सय गोर गोर उमा दादा अवाला।
सय गोर गोर उमा ऽ गा।
वल्ले चुडूर इनमा दादा अवाला।
वले फळा इनमा गा ॥ सयगोर...
फळा क्षाप वाटा दादा अवाला।
नळी लचके किता गा।
नवशिकी मंदा दादा अवाला।
बुजडबाजड आंता गा ॥ सयगोर......
कुर्स काल्के मंदांग दादा अवाला।
मल मुहरी मंदा गा।
पिटे मेंदूल मंदा दादा अवाला।
पोनी लेंग मंदा गा ॥ सय गरगर ...

"हे दादा! आमच्या वहिनीस धरून बोहल्याभोवती भरभर ओढ आणि प्रदक्षिणा घाल. (आमच्या वहिनीला) खूप लहानही समजू नकोस तर खूप मोठीही समजू नकोस. तिला भराभर बोहल्याभोवती ओढ.

तू मोठ्या झापीने चाल. पहा आमच्या वहिनीची कंबर लचकत आहे. ती नवखीच आहे दादा. ती बुजल्यासारखीच होते. तिला भराभर बोहल्याभोवती फिरव.

हे दादा! आमची वहिनी हरण-पायाची आहे. चेहऱ्याने ती मोरासारखी सुंदर आहे. शरीराने ती चिमणीसारखी पातळ आहे. पण तिचा आवाज





कापसाच्या पोतीसारखा मृदू आहे. हे दादा ! तिचा हात धरून बोहल्याभोवती भरभर प्रदक्षिणा घाल."

परधानसमाजात मुलांमुलींना लोकांकडून मिळणाऱ्या देणगी किंवा आहेराला "टीकांग" असे म्हणतात. "टीकांग" करण्याची मूळ पद्धत अशी आहे की वधू-वरांना मिळालेल्या कापडातून काही कपडे वराच्या प्रमुख आप्तेष्टांना वधू-वरांच्याच हस्ते वाटण्यात येतात. "अहीर" म्हणून खालील गीत म्हटले जाते.

"काईका काकाजी वाले रो दुलेहा ।
मनी इमे अमनने मामा बेटा। राजानोर मरीनी।
निवोर बाबो वातोर रो दुलेहा ।
बाळांग अहीरे ततोर रो ।।
निवोर बाबो वातोर रो। निवा बिजा जोडे कितोर रो ।
राजानोर मरीनी। मनी इमे अनमने मामा बेटा।।
निवोर तादो वातोर रो दुलेहा।
बाळांग अहीरे ततोर रो।
निवोर तादो वातोर रो। हाडेंग उगवे कितोर रो
राजानोर मरीनी। मनी इमे अनमने मामा बेटा
बाईका बाटो वाले रो दुलेहा।
मनी इमे अनमने मामा बेटा। राजानोर मरीनी।।

"हे नवतरुणा ! हे राजपुत्रा ! तू काकाचुलतेवाला असून तू मोठ्या घराण्याचा आहेस. तू काहीच अनमान करू नकोस.

तुझे वडील आलेले आहेत. त्यांनी तुला काय आहेर आणलेला आहे ?

तुझे वडील आले तर त्यांनी तुझ्या लग्नाचा जोडाघोडा बनवून दिला. (तुला चतुर्भुज केले) अरे राजपुत्रा ! तू काही अनमानू नको.

हे राजपुत्रा ! तुझे आजोबा आले आहेत तर त्यांनी कोणता आहेर आणला आहे ?

तुझे आजोबा आले. त्यांनी आयुष्यभर तुम्हा लोकांकरिता आपली हाडे झिजविली आहेत. हे बेटा ! त्यांच्याकडून काय अपेक्षा करतो ? काही मनाशी वाटून घेऊ नको

बहिणी आवाईवाला तू मोठ्या परिवाराचा राजपुत्र आहेस. तू काही हलके मन करू नकोस."

परधानांच्या लग्नातील अत्यंत करुणरम्य प्रसंग म्हणजे नववधूला निरोप देण्याचा. "कोराने उपुसमाळता" विधी होय. मीन गरसमाळ, चिखलामांदी पऱ्याक गरसमाळ, हाटगरसमाळ वगैरे अत्यंत मनोरंजक खेळ संपल्यानंतर वधूवरांस मांडीवर बसवून त्यांना आशीर्वाद द्यावा व त्यांना निरोप द्यावा या गंभीर अशा प्रसंगात सारा समाज काही काळपर्यंत अत्यंत दुःखी होतो. त्याचे चित्र रेखाटणारे खालील गीत पहा –

"परो इंगा साहोते मिवा तेरी दाऊरे।
खाळवो सहोते भैलोळा दाऊरे ।।
नेंड तेरी निवा कोराते दाऊरे।
नाळीते भैलोळा कोराते रे ।।
(चाल बदलवून)
चुडुरे उसरीपिट्टे, दाऊना कोराते।
दाऊना कोराताल, परिताले उसरीपिट्टे।
झाडो झाडी आळाल ।।
चुडुरे उसरीपिट्टे, यायाना कोराते।
यायाना कोराताल परिताले उसरी पिट्टे ।
झाडो झाडी आळाल ।।
चुडुरे उसरीपिट्टे दादाना कोराते।
दादाना कोराताल परिताले उसरी पिट्टे।
झाडो झाडी आळाल ।।"

"हे बाबा ! आईबापांचे प्रेम हे अमोल असते. त्या परदेशाचे प्रेम तर निकम्मे आहे. पण मी आजच्या दिवसापुरतेच तुमच्या पोटाशी चिकटून बसेन. उद्यापासून पूर्ण आयुष्यभर त्या परदेशाच्या वजनाखाली दडपून बसावे लागेल.

ही गोजिरवाणी बापडी चिमणी आज वडिलांच्या कुशीत जाऊन दडली आहे. पण ती वडिलांच्या मांडीवरून भुर्रर्र उडून जाईल व रानोवनी झाडोझाडीत रडत फिरेल.

ही केविलवाणी बापडी चिमणी आज आईच्या पोटाशी जाऊन चिकटली आहे. पण आईच्या कोऱ्यातून ती भुर्रकन उडून जाईल व रानोवनी झाडोझुडपी रडत फिरेल.

ही केविलवाणी बापडी चिमणी आज भावाच्या मांडीवर जाऊन बसली. पण भावाच्या मांडीवरून ती भुर्रदिशी उडून जाईल व रानोरानी आक्रोश करीत फिरेल."

त्या चिमणीप्रमाणेच नववधूचीही स्थिती असते. सर्व आप्तेष्टांच्या मांडीवर नवरीमुलगी क्रमाक्रमाने

बसते. सर्व आप्तेष्ट तिला यथाशक्ती पैसे देतात. पाठीवरून हात फिरवून आशीर्वाद देतात. आणि आपले डबडबलेले डोळे पुसत मोठ्या जड अंतःकरणाने मुलीस निरोप देतात. शेवटी वधूचा पिता आपल्या मांडीवरून आपल्या होऊ घातलेल्या सोयऱ्याच्या मांडीवर तिला बसवितो. याप्रमाणे मुलीला सासऱ्याच्या स्वाधीन केले जाते व तो गंभीर आणि करुण प्रसंग गुदरतो.

नववधू आपल्या स्वाधीन करून घेतल्यावर नवरदेवमुलगा आपल्या सासुसासऱ्यांना नमस्कार करतो. तसेच इतरही प्रतिष्ठित मंडळीस नमस्कार करून शेवटचा निरोप घेतो. त्यास 'भेटुनी' असे म्हणतात. त्याचे लग्नगीत खालीलप्रमाणे –

होरे ते आयानूर मूळयाले । गपे कालके कराना ।
होरे आयानूरतयमुळयाले । गपे कालके कराना ।
हादे आयाले बा पोराले । गपे कालके कराना ।
हादे आयाले तंगोराले । लके कालके बी कराना
वगैरे...

"तो सासरा पुढे आहे. त्याच्या पायावर मस्तक ठेऊन नमस्कार कर. तो ( नवरीचा मोठा भाऊ ) भाव सासरा होय. त्याच्या पायावर मस्तकं ठेऊन नमस्कार कर. ती तुझी सासू होय. तिच्या पायावर डोके ठेऊन नमस्कार कर आणि ती तुझी अक्कड सासू ( नवरीची मोठी बहीण ) होय. तिला मात्र दुरूनच नमस्कार कर."

याप्रमाणे सर्वांनाच नमस्कार करून निरोप घेतात. नवऱ्यामुलीस लग्नमंडपातच सोडून देऊन नवरीकडील सर्व वराती परत जायला निघतात. तेव्हादेखील महिला गीते म्हणतच असतात. वरपक्षाकडील एक गीत आहे–

"वरकेमासी सरकेमाया लाता ।
लाता दे भाभी दरे[१] ।
बकरा खाऊन टक्कर मारून जाते ।
जाते दे भाभी दरे[१] ।
मसके मासी धसका जिया लाता ।
लाता दे भाभी दरे[१] ।
वरके मासी सरके माया लाता ।
लाता दे भाभी दरे[१] ।
गिटके कीसी मिटका जिया लाता ।
लाता दे भाभी दरे[१] ।"

"ओळखूनपाळखून ही संगो दूर दूर सरकत चालली आहे. बकरा खाऊन टक्कर मारून राहीली आहे. ही संगो पहा कशी आहे– दात मसकून जोराचा धक्का मारीत आहे. आणि ओळखूनपाळखून दूर सरकत आहे. खाल्लेले गिळून मिटक्या मारीत आहे. ही संगो ओळखून दूर दूर जात आहे."

सहावा दिवस उजाडतो. नवरी-नवरदेवांची हळद आज उतरविली जाते. त्यास "पीची उसमाळ" असे म्हणतात. या प्रसंगी बहुतेक नवरदेवाच्या कुटुंबातीलच मंडळी उपस्थित असते. हळद उतरवून नवरी-नवरदेवास न्हाऊ घालतात. त्या वेळी खालील गीत म्हणतात.

"तेदा भाभी दे ।
कोर कुसता । फल वळीता ।
तेदा भाभी दे ॥ धृ ॥
तेदीसियोर वो ।
कैतपरो । कय वाळतोर ।
तेदीसियोर वो ॥ १ ॥ तेदा भाभी दे
तेदीसियोर वो ।
कादपरो । काल वाळतोर ।
तेदी सियोर वो ॥ २ ॥"

"अग वहिनी उठा. कोंबडा आरवला. सकाळ झाली. हे भाबी ! लवकर झोपून ऊठ ॥ धृ० ॥

होय संगो ! पण हे मला उठू देत नाहीत. त्यांनी माझ्या हातावर हात टाकला आहे. ते मला उठून देत नाहीत ॥ १ ॥ उठा वहिनी, दिवस निघाला आहे. ।

होय संगो ! पण हे मला उठूच देत नाहीत. त्यांनी माझ्या पायावर पाय टाकला आहे. ते मला उठूच देत नाहीत ॥ २ ॥ उठा वहिनी उठा, दिवस निघाला. ।"

नवरी नवरदेवांची हळद उतरल्यावर त्यांच्या हस्ते कुलदेवतांची पूजा केली जाते व आपल्या गोत्रातील सर्वांचा परिचय तसेच पूर्वजांच्या आठवणी काढल्या जातात. आपल्या गोत्राचे महत्त्व वर्णन केले जाते. ह्या विधीला देवा देवी असे म्हणतात.

देवा देवीचा प्रसाद ग्रहण करून गोंड परधान लोक हा लग्नसोहळा संपवितात.



अनुक्रमणिका






**'कृष्णाकाठचे यज्ञयोगी'** (श्रौताचार्य धुंडिराजशास्त्री दीक्षीत बापट जीवन-स्मृतिग्रंथ)—संकलन : चि. धुं. बापट; शब्दांकन : श्री. पु. हिर्लेकर; स्वाध्याय प्रकाशन, स्वाध्याय मंदिर, पांचवड (ता. वाई जि. सातारा); १९८३; पृष्ठे ३३६; मूल्य ७५ रु.

श्रौताचार्य धुंडिराजशास्त्री बापट (जन्म १८८२–मृत्यू १९५६) यांची जन्मशताब्दी १९८३ मध्ये साजरी करण्यात आली. त्या निमित्ताने त्यांच्या जीवन-कार्याचे यथार्थ दर्शन घडविणारा चरित्रग्रंथ 'कृष्णाकाठचे यज्ञयोगी' या नावाने प्रसिद्ध करण्यात आलेला आहे. बापटशास्त्री हे मूळचे वाई तालुक्यातील पांचवड या गावचे रहिवासी असल्याने व त्यांचे वास्तव्य अनेक वर्षे पांचवड व वाई येथे असल्याने व त्यांनी आपले सारे आयुष्य श्रौतविद्येच्या अध्ययनात व प्रत्यक्ष आचरणात घालविले असल्याने त्यांच्या चरित्रग्रंथाचे 'कृष्णाकाठचे यज्ञयोगी' हे नाव अतिशय समर्पक असे वाटते. या चरित्रग्रंथाचा आणखी एक विशेष म्हणजे बापटशास्त्री यांच्या चरित्राच्या सर्व साधनांचे संकलन करणारे त्यांचे चिरंजीव चि. धुं. बापट व प्रत्यक्ष शब्दांकन करणारे अमरावती येथील श्री. पु. हिर्लेकर यांनी हा चरित्रग्रंथ तयार करताना त्यातील माहिती उपलब्ध कागदपत्रांवरून व अनेक समकालीनांच्या आठवणींवरून प्रत्यक्ष तपासून दिलेली आहे. त्यामुळे अत्यंत काटेकोरपणे व मोठ्या विचक्षण बुद्धीने या चरित्रग्रंथातील माहितीचे संकलन व प्रत्यक्ष शब्दांकन केले असल्याचे प्रथमदर्शनीच जाणवते.

श्रौताचार्य धुंडिराजशास्त्री बापट हे पांचवडसारख्या एका लहान गावातील वैदिकशास्त्री होते. परंतु त्यांनी सप्तसोमयागांच्या व प्रवचनांच्या निमित्ताने महाराष्ट्रात व महाराष्ट्राच्या बाहेरही संचार केला. श्रौतकर्मातील त्यांचे कौशल्य मोठे होते. अधिकारी प्रवचनकार व परिवर्तनवादी शास्त्री म्हणून त्यांनी त्यांच्या संपर्कात आलेल्या अनेक व्यक्तींना आकर्षित करून घेतले. ज्ञानकोशाच्या संपादक मंडळात त्यांचा समावेश करण्यात आला होता व ज्ञानकोशातील 'वेदविद्या' हे प्रकरण तयार करण्यात त्यांचा मोठा सहभाग होता. वाई येथील प्राज्ञपाठशाळा मंडळाच्या 'धर्मकोश' या प्रकल्पातही त्यांनी काही काळ काम केले. शेवटी पुणे येथील वैदिक संशोधन मंडळातर्फे प्रसिद्ध झालेल्या श्रौतकोशाचे त्यांनी संपादन केले. याप्रमाणे कोशसंपादनाचे काम करीत असतानाच बापटशास्त्री यांनी १) आर्यांचे संस्कार, २) आर्यसंस्कृती, व ३) वैदिक राष्ट्रधर्म असे स्वतंत्र ग्रंथ लिहिले आणि १) ऐतरेय ब्राह्मण, २) श्रीरुद्राध्याय, ३) गणपती अथर्वशीर्ष, ४) शुक्लयजुर्वेद वाजसनेय संहिता इत्यादींचे त्यांनी मराठी भाषांतर केले. त्यासाठी त्यांनी स्वाध्यायमंदिर व स्वाध्याय प्रकाशन अशी संस्थाही पांचवडसारख्या लहान गावात सुरू केलेली होती.

बापटशास्त्री हे जुन्या पिढीतील शास्त्री असले तरी ते परिवर्तनवादी शास्त्री होते व त्रैवर्णिकांना वेदांचा अधिकार असल्याचे मत त्यांनी प्रतिपादन केले होते. क्षत्रिय-वैश्यांच्या द्विजत्वाचे पुनरुज्जीवन करून त्यांची प्रत्यक्ष उपनयने घडवून वैदिक संस्कारपद्धती पुन्हा प्रचलित करून त्रैवर्णिकातील वैदिक कर्मविषयक विषमता काढून टाकून हिंदुसमाजाला सुसंघटित करण्याचे ध्येय त्यांनी स्वीकारले होते व त्याप्रमाणे त्यांचे प्रत्यक्ष आचरणही होते. त्यानिमित्ताने विठ्ठल रामजी शिंदे व कर्मवीर भाऊराव पाटील हेही त्यांच्या संपर्कात आलेले होते.

बापटशास्त्री यांनी स्वतः सप्तसोमयाग केले. १९५१ साली झालेल्या सोमनाथप्रतिष्ठापनेच्या वेळी ते तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे एक ज्येष्ठ सहकारी म्हणून हजर होते. १९५५ साली पुणे येथे त्यांनी वाजपेय अनुष्ठान केले होते. त्या वेळी संपूर्ण महाराष्ट्रात या वाजपेय यज्ञास प्रसिद्धी मिळाली होती.

बापटशास्त्री यांचे व्यक्तिमत्त्व हे बहुरंगी होते. त्यांचे बोलणे अतिशय नाट्यमय असे व त्यामुळे त्यांच्या संपर्कात येणारा प्रत्येकजण त्यांच्याकडे

आकर्षित होत असे. ते जसे एक विद्वान शास्त्री होते, तसेच काही काळ एक गुणी नट म्हणूनही ते महाराष्ट्रात प्रसिद्धी पावले होते. कै. अच्युत बळवंत कोल्हटकर यांच्या नाटककंपनीत असताना नाटकासाठी म्हणून ज्या गावी जावे लागे, त्या गावी ते प्रवचनही करीत असत. त्यामुळे सायंकाळी एखाद्या मंदिरात पाहिलेला प्रवचनकार रात्रीच्या वेळी नाट्यमंदिरात पाहून अनेकांना विस्मय वाटत असे. अशा प्रकारचे बहुरंगी व्यक्तिमत्त्व असणाऱ्या बापटशास्त्र्यांचे जीवनचरित्र " कृष्णाकाठचे यज्ञयोगी " या चरित्रग्रंथात वाचावयास मिळते. त्यांचे कर्तृत्व, व्यक्तित्व, व्यक्तिमत्त्वाचा झालेला विकास असे वेगवेगळे विभाग या ग्रंथात पाडलेले असून एक आकर्षक असा छायाचित्रसमुच्चयही जोडलेला आहे.

या चरित्रग्रंथात ज्याप्रमाणे बापटशास्त्री यांच्याविषयी सर्व माहिती आलेली आहे, त्याप्रमाणेच त्यांच्या संपर्कात आलेल्या अनेक व्यक्तींची माहितीही आलेली आहे. या ग्रंथात समाविष्ट केलेले सौ. शांताबाई लिमये, चिं. ग. काशीकर, ना. श्री. सोनटक्के, कै. सौ. सुलोचनाबाई गोखले इत्यादींचे स्वतंत्र लेखही वाचनीय आहेत. कै. बापटशास्त्र्यांच्या जीवनचरित्राच्या अनुषंगाने पांचवड या गावच्या काही घटनांचा उल्लेखही आलेला असून तो अत्यंत वाचनीय असा झालेला आहे. पांचवड हे गाव सरदार नातूंना इनाम मिळण्यापूर्वी गावाची स्थिती काय होती, येथले मूळचे लोक कोण,. कोण केव्हा बाहेरून आले, गावात निरनिराळ्या क्षेत्रांत विद्वान व कर्तृत्ववान मंडळी कोण कोण होती, श्रीकज्जलेश्वर देवाचा प्रथमोत्सव केव्हा झाला, साताऱ्याचे कै. भाऊसाहेब सोमणांचे वडील येथल्या प्राथमिक शाळेत केव्हा मास्तर होते, 'सोशल क्लब पांचवड' नावाची नाट्यसंस्था स्थापन करून येथल्या हौशी मंडळींनी कोणती नाटके केव्हा केली, लोकमान्य टिळकांचा गावाच्या शिवेवर ग्रामस्थांतर्फे सत्कार कोणत्या साली झाला, औंधचे प्रतिनिधी, भव्य विद्वान, शास्त्री, कलावंत मंडळी या गावात कोण कोण केव्हा येऊन गेली, चातुर्मास्ययागाचा अपूर्व सोहळा या गावात केव्हा पार पडला इत्यादी घटनांचे उल्लेखही या चरित्रग्रंथात आलेले आहेत.



कै. बापटशास्त्री यांचा उल्लेख कलियुगातील वसिष्ठ वामदेव म्हणून कसा झाला (पान १९१), ते एक अधिकारी श्रोत्रीय (पान १८६), लोकोत्तर प्रवचनकार (पान १९९), गुणी नट (पान २०४) कसे होते व सर्वांशी समरस होण्याचा दुर्मिळ गुण त्यांच्याजवळ कसा होता (पान२४५) हे सर्व मुळातूनच वाचणे जरूर आहे. अभ्यासकांच्या दृष्टीने बापटशास्त्र्यांच्या लेखांची सूची (पान २८४), त्यांच्या काही रचना (पान २७९) व त्यांचे काही विचार (पान २७१) हे विभाग अत्यंत उपयोगी असे आहेत.

**– अशोक सदाशिव भट**

---

**व्यवहारात विज्ञान पहा**– डॉ. गो. रा. केळकर; अनिरुद्ध प्रकाशन, पुणे ३०, १९८१; पृ. ११६; किं. ११ रुपये.

---

शास्त्रीय ज्ञानाची सर्वसामान्य माणसाला जवळून ओळख व्हावी ह्या उद्देशाने लिहिलेलं, व्यवहारात विज्ञान कसे उपयोगी पडेल याचा मागोवा घेणारं हे चिमुकलं पुस्तक ! डॉ. गो. रा. केळकर या नॅशनल केमिकल लॅबोरेटरीमध्ये शास्त्रज्ञ असलेल्या विचारवंतांच्या लेखणीतून साकार झालेलं ! भोवतालच्या विश्वात घडणाऱ्या घडामोडींत शास्त्रीय ज्ञान कसं खच्चून भरलं आहे हे सोप्या, घरगुती भाषेत समजावून सांगणारी विज्ञानावरची पुस्तके मराठी भाषेत तुलनात्मक दृष्टीने कमीच ! दिवसेंदिवस शास्त्रीय ज्ञानात रोज भर पडत असलेल्या आजच्या जमान्यात डोळे उघडे ठेवून सभोवार पाहिले तर व्यवहारात आजूबाजूला दिसणाऱ्या घटनांचा शास्त्रीय कार्यकारणभाव लक्षात येण्यास वेळ लागत नाही. जरूर आहे ती शास्त्रीय दृष्टीने वस्तूकडे पाहण्याऱ्या विज्ञानवादी दृष्टिकोणाची !

११६ पानांच्या या छोट्याशा पुस्तकात असं कितीसं लिहिणं शक्य आहे ? पण आपल्या नित्याच्या जीवनात हरघडी दिसून येणाऱ्या बाबींची वैज्ञानिक शहानिशा जिज्ञासूंना व्हावी म्हणून निरनिराळे रंग, प्लॅस्टिक, ॲल्युमिनियम, मिश्र धातू, निरनिराळे सुगंध यांसारख्या विषयांची शास्त्रीय माहिती

यात दिली आहे. तसंच कल्हई लावणे, सोन्या-चांदीचे दागिने घडविणे, यांसारख्या हरघडी व्यवहारात जरूर भासणाऱ्या गोष्टींची शास्त्रीय चिकित्सा केली आहे. तसंच उन्हाळा, पावसाळा आदी ऋतूंत निसर्गाचे विविध अविष्कार कसकसे होतात याचीही मनोरंजक माहिती यात दिली आहे. संदर्भानुसार प्लॅस्टिकचा आद्य संशोधक डॉ. बॅकेलॅंड, रंगाचा शोध लावणारा पर्किन, मधुमेहावर प्रभावी उपाय शोधून काढणारा संशोधक डॉ. फ्रेडरिक बॅंटिंग यांसारख्या शास्त्रज्ञांची माहितीही त्या त्या ओघात दिलेली आढळते.

डॉ. केळकरांनी वरील विषयांवर सृष्टिज्ञान, सह्याद्रि, जीवनशिक्षण यांसारख्या कालिकांतून वेळोवेळी लिहिलेल्या १५ लेखांत अद्ययावत माहितीची भर घालून त्या लेखांचा पुस्तकरूपात अवतीर्ण केलेला हा संग्रह ! त्यामुळे पुस्तक उघडून कोणत्याही लेखाचं स्वतंत्र वाचन करता येतं. ओघवती शैली असल्याने आणि दैनंदिन जीवनातील दृष्टान्त देऊन विषय खुलविण्याच्या पद्धतीने पुस्तक निःसंशय वाचनीय झालं आहे !

या पुस्तकाचं दुसरं वैशिष्टय असं, की पुस्तकात आलेल्या कठीण पारिभाषिक शब्दांची सूची, त्यांचे इंग्रजी-मराठी शब्दार्थ (ग्लॅसरी) आणि पुस्तकात आलेल्या विषयांची सूची ! या सोयीमुळे पुस्तकाच्या उपयुक्ततेत भरच पडली आहे. या लेखसंग्रहाला महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळाले आहे. त्याचा हेतूही अशा तऱ्हेची शास्त्रीय ज्ञानावर लिहिलेली पुस्तके मराठीत वरचेवर उपलब्ध व्हावीत हाच असावा. या पुस्तकाचा अनुभव जमेशी धरून डॉ. केळकरांनी 'रबर' या विषयावर एक पुस्तिका लिहिली आहे अन् ती प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

भारतीय भाषाभगिनींच्या एकूण वाङ्मयनिर्मितीत विज्ञानाचा परिचय सोप्या भाषेत करून देणाऱ्या पुस्तकांची निर्मिती तुलनात्मक पाहता खूपच विरळ दिसते. त्यात या पुस्तकाने निश्चितच भर घातली आहे असं म्हटलं पाहिजे. या लेखसंग्रहाचा हिंदी-गुजराती-कन्नड-बंगाली आदी भाषांतून अनुवाद झाल्यास या ज्ञानाचा अखिल भारतीय जनतेला उपयोग होऊ शकेल.

सध्या माध्यमिक शाळांतून त्या त्या कक्षेच्या गटासाठी पुरवणी-वाचनसाहित्याचा एकेक संच तयार ठेऊन तो रिकाम्या तासाच्या वेळी वाचनास दिला जातो. अशा संचात या पुस्तकाचा समावेश होणं इष्ट आहे. कारण मानसिक जडण-घडण होत असलेल्या या संस्कारक्षम वयात अशी पुस्तके हातात आल्यास चौकस बुद्धीच्या मुलांच्या वैचारिक क्षमतेत निश्चितच वाढ होईल.

एक नेहमीची अडचण या संदर्भात लक्षात भरते; ती ही, की प्रकाशक पुस्तके छापून घेऊन गिऱ्हाइकाची वाट बघत स्वस्थ बसतात. खेडोपाडी पसरलेल्या जिज्ञासू वाचकांपर्यंत त्यांचा प्रचार वा प्रसार व्हावा तसा होत नाही. ग्राहक आहे, पण मालाची माहितीच त्याच्यापर्यंत पोचत नाही. त्यामुळे मालाचा उठाव होत नाही, माल पडून राहतो या नावाखाली प्रकाशक असली पुस्तके हाती घेण्यास धजावत नाही. प्रकाशक मिळत नाहीत म्हणून लेखक लिहिण्याच्या फंदात पडत नाहीत. अशा या दुष्टचक्रातून वाट काढून डॉ. केळकरांनी शास्त्रीय विषय सोपा करून सांगण्याचा हा जो खटाटोप केला आहे, याबद्दल मराठी माणूस नेहमीच त्यांचा कृतज्ञ राहील.

— ना. बा. मराठे

० ० ०

## साभार पोच

* **ऋग्वेदसार** ( मराठी अनुवाद ) — संकलक पू. विनोबा भावे; अनुवादक म. अ. मेहेंदळे; वैदिक संशोधन मंडळ प्रकाशन; १९८२; पृ. ३१०; किं. ३६ रुपये.

* **श्रीकृष्णामाहात्म्य** ( पुनर्मुद्रण ) ग. रा. वैद्य; प्रकाशक श्री. नी. लेले; ३८९ मधली आळी. वाई– ४१२८०३ ( जि. सातारा ) ; १९८३; पृ. १७+१४५; किं. २० रुपये.

अनुक्रमणिका







## वाद–संवाद

संपादक,
नवभारत यांस,
स. न. वि. वि.

श्री. भुजंग मेश्राम ह्यांच्या नवभारतात प्रसिद्ध झालेल्या एका लेखाच्या संदर्भात मी एक पत्र आपणाकडे पाठविले होते. नवभारताच्या ऑक्टो. ८३ च्या अंकात श्री. व्यंकटेश आत्राम ह्यांनी त्याला दिलेले उत्तर वाचले.

श्री. भुजंग मेश्रामांनी अज्ञानापोटी काही विधाने केली असतील ; परंतु श्री. व्यंकटेश आत्राम ह्यांची भूमिका मात्र साऱ्या गोंड जमातीचे आपणच एकमेव प्रवक्ते आहोत आणि जे गोंड नाहीत त्यांनी गोंडांबाबत काही लिहू-बोलू नये अशी असल्याचे जाणवते. स्वच्छ संशोधनात्मक भूमिकेतून करावयाच्या वाद-संवादाला ही भूमिका उपकारक नाही.

श्री. व्यंकटेश आत्राम त्यांच्या पत्रात (नवभारत– ऑक्टो ८३, पृ. ४७, स्तंभ २, १३ वी ओळ) म्हणतात, की मी अकारणच श्री. भुजंग मेश्रामांच्या तोंडी "आजवरचे संशोधन वरपांगी झाल्याचा दावा" घालण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु त्यांनी श्री. भुजंग मेश्रामांचा लेख (नवभारत– जुलै ८३, पृ. २८, स्तंभ २, शेवटून ५ वी ओळ) नीट वाचल्यास त्यांच्या लक्षात येईल, की श्री. भुजंग मेश्रामांनी स्पष्टपणे तसे म्हटलेले आहे. तेव्हा मी अकारण काही केलेले नाही हे लक्षात यावे.

त्यापुढे १६ व्या ओळीत श्री. व्यंकटेश आत्राम म्हणतात, की श्री. भुजंग मेश्रामांनी कोणत्याही संशोधकांचा व त्यांच्या कार्याचा उल्लेख केलेला नाही. परंतु श्री. मेश्रामांच्या लिखाणात जेव्हा आजवरचे संशोधन असा शब्दप्रयोग येतो तेव्हा प्रत्येक संशोधकाचा वेगळा उल्लेख नसला, तरी त्याचे कार्य श्री. मेश्रामांना माहीत असावे असे त्यांच्या विधानावरून वाटते. तेव्हा ११ व्या ओळीत ते म्हणतात तशी मी नावे "पदरची घुसडली" नाहीत. मी तर आता श्री. मेश्रामांनाच आव्हान करतो, की आजवरच्या संशोधकांच्या नेमक्या उणिवा त्यांनी अवश्य दाखवून द्याव्यात किंवा "या संशोधकांच्या कार्याची तपासणी न करताच मी हे विधान केले" अशी जाहीर कबुली त्यांनी प्रामाणिकपणे द्यावी व आपले विधान मागे घ्यावे.

पुढे श्री. आत्राम ओळी २३ ते २६ मध्ये म्हणतात, की "गोंडांच्या गोत्रनामांच्या संदर्भात पुस्तकच नाही" व "पूर्वसूरींनी या संदर्भात लिहिलेच नाही". श्री. आत्रामांच्या दुर्दैवाने वस्तुस्थिती निराळीच आहे. यापूर्वी अनेक संशोधकांनी गोंडांच्या गोत्रनामांविषयी संशोधन केले आहे आणि त्या संदर्भात लिहिले आहे. काही वेचक ग्रंथांची नावे पुढीलप्रमाणे– १) रसेल व हिरालाल– दि कास्ट्स अँड ट्राइब्ज ऑफ सेन्ट्रल प्रॉव्हिन्सेस ऑफ इंडिया– १९१६. २) स्टीफन फुक्स – दि गोंड अँड भुमिया ऑफ ईस्टर्न मांडला– प. आ. १९६० – दु. आ. १९६८. ३) फ्यूरर हैमनडॉर्फ– (अ) दि राज गोंड्स ऑफ आदिलाबाद – १९४८, (ब) दि प्रधान्स : दि बार्डस ऑफ दि राज गोंड्स– १९५१. ४) ग्रीगसन डब्ल्यू. व्ही. – दि मारिआ गोंड्स ऑफ बस्तर, १९३८. ५) राव सी. एच. – दि गोंड्स ऑफ दि ईस्टर्न घाट्स : इंडिया – १९१०. ६) राव पी. एस. – अमंग दि गोंड्स ऑफ अदिलाबाद – १९४९. ७) सिंग आय. – दि गोंडवन अँड दि गोंड्स – १९४४. ८) रिसले – दि गोंड्स ऑफ बेंगाल. आता ही यादी येथेच थांबवतो.

आता आत्रामांनी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे पुढीलप्रमाणे– १) ४ सगांपेक्षा कमी अधिक आहेत काय याचेही उत्तर होय असेच आहे. स्टीफन फुक्सला पूर्व मांडला जिल्ह्यात तीन देवे, चार देवे, पाच देवे, सहा देवे व सात देवे असे पाच गोत्रसंच आढळले. तसेच पी. बी. बोस यांनाही छत्तिसगड (म. प्र.) या प्रदेशात गोंडांत असेच पाच गोत्रसंच आढळले आहेत. याखेरीज मद्रास (जुने) या प्रदेशात देवे सगांच्या ऐवजी वंशपद्धतीचे गोंडांचे गट आढळले आहेत. त्यांची संख्या तीन एवढी आहे.

त्यापुढे जाऊन आतापर्यंत मी उल्लेख न केलेला नवा मुद्दा मांडतो. श्री. मेश्राम आपल्या लेखात (पृ. २७, स्तंभ १, ओळ २७–२८) मध्ये म्हणतात, की

अनुक्रमणिका

गोंडांचे बावीस देव ४+५+६+७ असे विभागले गेलेले आहेत. फुक्सच्या माहितीनुसार सात देवांची एक यादी असून सात देवे सर्व सात देवांची पूजा करतात. सहा देवे त्यांतील सहाच देवांना, पाच देवे त्यांतल्याच पाच देवांना, चार देवे त्यांतल्याच चार देवांना व तीन देवे त्यांतल्याच तीन देवांना अशा पद्धतीने पूजतात. तेव्हा याही ठिकाणी आत्रामांनी स्वतः घेतलेल्या भूमिकेचा विचार करावा.

त्यापुढे श्री. आत्राम पृ. ४८, स्तंभ १, ओळी ६ ते ८ मध्ये विचारतात, की एकच गोत्रनाम विविध गोत्रसंचांत आढळते काय? याचेही उत्तर होय, असेच आहे. फुक्सला दोन गोंडांनी स्वतंत्रपणे ज्या याद्या दिल्या त्यांमध्ये एकाने धुर्वे हे गोत्रनाम पाच देव्यांमध्ये सांगितले. तसेच कोल्हिया हे गोत्रनाम एकाने सात देवे तर दुसऱ्याने तीन देवे म्हणून सांगितले; तसेच नारेती हे गोत्रनाम एकाने पाचदेवे व दुसऱ्याने सहादेवे म्हणून सांगितले. यावर श्री. आत्रामांचे काय म्हणणे आहे? शिवाय फुक्सने मिळवलेल्या यादीन तीन देवे म्हणून जी गोत्रनामे आहेत. ती श्री. आत्रामांच्या यादीत असणार की नाही? असल्यास कोठे?

त्यापुढे ओळी १४–१५ वाचून श्री. आत्रामांची माहिती अपुरी आहे असे वाटते. 'गोंडांची देवे प्रकरणे, गोत्र प्रकरणे किंवा गोत्र संच प्रकरणे' यावर पुढील संशोधकांचे कार्य झालेले आहे– १) फुक्स स्टीफन– कित्ता (वर उल्लेखलेले पुस्तक) २) बुरडकर एम. पी. – टोटेमिझम अमंग दि गोंड्स १९४०. क्लॅन ऑर्गनायझेशन ऑफ दि गोंड्स– १९४७. ३) स्टीफन फुक्स– (अ) दि सोशल ऑर्गनायझेशन ऑफ दि गोंड इन ईस्टर्न मांडला– १९५२, (ब) टेल्स ऑफ गोंडवन– १९६०. ४) हसन एस. एस. – दि कास्ट्स अँड ट्राइब्ज ऑफ दि निझाम्स डोमिनियन– १९२०. ५) फेरिरा जे. व्ही. –टोटेमिझम इन इंडिया– १९६५.

यांखेरीज भारतीय भाषांमध्ये प्रसिद्ध झालेले व आधीच्या यादीतील काही पुस्तकांतले संशोधन निराळेच. याच संदर्भात पृ. ४७, ओळ २२ मध्ये ते म्हणतात, की गोंडांची ७५० गोत्रनामे आहेत. त्यांनी कृपया तावडतोब ती यादी प्रसिद्ध करावी. कारण आजपर्यंतच्या संशोधकांना जास्तीत जास्त २०० ते २५० इतकीच गोत्रनामे मिळाली आहेत!

गोंडांचा नागांशी संबंध व मोहेंजोदारोशी संबंधी याविषयीच्या यापूर्वीच्या पत्रात मी जे म्हटले आहे, त्याची आठवण करून देतो, की 'लेखकाने इतरांची मते ओढून ताणून आपल्या लेखात का आणून बसवली ते समजत नाही.' एवढेच मी म्हटलेले आहे व त्या माहितीविषयी मी काहीच म्हटले नाही. तरी श्री. आत्रामांनी आपल्या पत्रात पृ. ४८, स्तंभ १, ओळ २५ व ओळ ३८ मध्ये माझ्या तोंडी अकारण काही गोष्टी का घुसडल्या आहेत, ते समजत नाही.

त्यापुढे तूप अर्थाच्या गोंडी शब्दाचा ऊहापोह करताना श्री. आत्रामांनी ऋग्वेद वगैरेचे आपल्याला ज्ञान आहे हेही सांगितले आहे. मी जो मुद्दा मांडला तो श्री. आत्रामांना समजलाच नसावासे वाटते. श्री. मेश्रामांचे त्यांच्या लेखात असे प्रतिपादन आहे, की (पृ. २५, स्तंभ १, ओळ ११ व २१) 'गोंडीतल्या शब्दांची काही वैशिष्टयपूर्ण घडण असते' आणि 'प्रत्येक नावाला स्वतंत्र अर्थ व संदर्भ असतो'. त्यावर मी म्हटलेले आहे, की 'प्रत्येकच भाषेविषयी हे खरे आहे. त्याचे विशेष वाटण्याचे किंवा भासवण्याचे काही कारण नाही'. यावर श्री. आत्राम काहीही न बोलता आपले श्री. मेश्रामांपेक्षा निराळेच प्रतिपादन मांडतात. यामुळे माझ्यासारख्या त्रयस्थ अभ्यासकाच्या मनात प्रश्न उभा राहतो, की स्वतःला साहित्यिक किंवा संशोधक किंवा दोन्ही समजणाऱ्या, एकाच पिढीतल्या दोन गोंडांना जर आपल्या भाषेतल्या साध्या शब्दांची व्युत्पत्ती सुसंगत मांडता येत नसेल, तर पिढ्यानपिढ्या लोकसंचितात साठलेल्या ज्ञानाचा ते अर्थ कसा लावणार आणि त्यांनी लावलेलाच अर्थ खरा असे कोणत्या आधारावर मानायचे? तिसऱ्या एखाद्याने तिसराच काही अर्थ सांगितला तर? असो.

त्यापुढे पृ. ४८, स्तंभ २, ओळ २४–२५ यांत माझ्यावर केलेला आरोप खरा नाही. श्री. मेश्रामांनी स्वतःच्या लेखात पृ. २६, स्तंभ २, ओळ २८ या ठिकाणी जी माहिती दिली तिचाच मी आधार घेतला होता. भाऊ मांडवकरांचा या संदर्भात मी उल्लेखही केलेला नाही. शिवाय श्री. मेश्रामांपेक्षा श्री. आत्राम काही वेगळीच माहिती पुरवतात.



अनुक्रमणिका

त्यामुळे वर मांडलेलीच शंका पुन्हा माझ्या मनात उभी राहते, की खरे कोणाचे मानायचे ? शिवाय गोत्रनामे, स्थलनामे व आडनावे बदलतात हे माझे 'मत' नसून या क्षेत्रातील अनेक संशोधकांनी आपापल्या अभ्यासानंतर ते मत निष्कर्ष म्हणून प्रसिद्ध केले आहे. तसेच ते फक्त गोंडांपुरते लागू नसून सर्वच समाजांना– मग आदिवासी असोत की नसोत– सारखेच लागू पडणारे आहे. श्री. आत्रामांना त्याचे वावडे का वाटावे ?

आत्राम आडनावाची प्राचीनता किंवा समुद्राच्या पलीकडून गोंडांनी येण्याची कथा या दोन्ही बाबतीतला माझा मूळ मुद्दाच श्री. आत्रामांना समजला नसावासे दिसते. श्री. मेश्राम आपल्या लेखात ( पृ. २५, स्तंभ १, ओळ २१–२३ ) म्हणतात, की 'गोत्रनामांच्या सहाय्याने... मूळ इतिहासाकडे जाता येईल' या सर्वसाधारण विधानाच्या पुष्टचर्थ त्यांनी जी उदाहरणे दिली, ती त्यांनाच कशी अडचणीत आणतील ते मी दाखवून दिलेले आहे. तीच गोष्ट गोत्रनामांच्या अर्थाविषयी झालेली दिसते. ते अर्थ बरोबर आहेत की चूक आहेत, हे ठरविण्याचा प्रयत्न मी केलेलाच नाही; कारण श्री. आत्रामांनी म्हटल्याप्रमाणे मला ज्या भाषेची बाराखडीही माहिती नाही त्याविषयी मी कसा बोलणार ? माझा प्रश्न वेगळाच आहे (जो श्री. आत्रामांना समजलेला दिसत नाही). तो म्हणजे 'नाक' म्हणजे 'महत्त्वाचे' असा जो मराठीत सांकेतिक अर्थ आहे व ते दर्शविणाऱ्या म्हणी व वाक्प्रचार मराठीत आहेत तसेच्या तसे गोंडी भाषेत आहे का ? कारण मराठी सोडल्यास इतर कोणत्याही भारतीय भाषांमध्ये (हिंदीमध्ये एखादा अपवाद वगळता) तसा अर्थ नाही. जरी त्यांपैकी बऱ्याच भाषा एकाच मूळ भाषेपासून झाल्या असल्या तरी. मग गोंडी भाषा जी ग्रीयर्सन व अन्य संशोधकांच्या मते तामिळ व कानरी (कानडी नव्हे) भाषेशी अधिक जवळीक सांगते, मराठीशी नव्हे, तर त्या भाषेत, मराठीतील सांकेतिक अर्थ जसेच्या तसे असतील का, अशी शंका मी व्यक्त केली तर त्यात काहीही चूक नाही. मराठी व गोंडी भाषेतील समानार्थी म्हणी व वाक्प्रचारांचा कोश जर श्री. आत्रामांनी प्रसिद्ध केला तर आमच्यासारख्या अभ्यासकांना त्याचा जरूर फायदा होईल. या संदर्भात एक महत्त्वाची गोष्ट सांगू इच्छितो, की अनेक संशोधकांनी असे मुद्दाम नमूद केले आहे, की त्यांच्या गोंड माहितगारांनी गोंडी गोत्रनामांना जे शाब्दिक अर्थ आहेत त्यांपलीकडे जाऊन काही खास अर्थ नसल्याचे सांगितले आहे. याखेरीज माझ्या ज्या प्रश्नाचे उत्तर देण्याचे श्री. आत्रामांनी टाळलेच आहे तो म्हणजे मेश्रामांना हवा असलेला मूळ इतिहास यातून कोठे मिळतो ?

याखेरीज श्री. आत्रामांनी श्री. मेश्रामांच्या लेखात किंवा माझ्या पत्रात नसलेले गोंडवाना लँडसारखे काही मुद्दे उपस्थित केले आहेत. माझ्यापाशी त्याविषयीही भरपूर माहिती उपलब्ध आहे, पण जागेअभावी ती देत नाही.

आणखी एक. श्री. व्यंकटेश आत्राम ( ज्यांनी मानववंशशास्त्राचा किती अभ्यास केला आहे हे, ते सांगायला तयार नाहीत ) गरज पडेल तेथे इ. ८ वीच्या पुस्तकात उल्लेखलेल्या व ऑस्ट्रेलियासारख्या दूर असणाऱ्या देशातील शास्त्रज्ञाने मांडलेल्या सिद्धान्ताचा आधार घेणार; परंतु सोयीचे नसेल तेथे किंवा निव्वळ अज्ञानापोटी 'सद्यःस्थितीत प्रचलित असलेले समाजशास्त्र किंवा मानववंशशास्त्र तोकडेच आहे' असा स्वदेशातील संशोधकांचा अधिक्षेप करणारा शेरा मारणार. बरे, त्यांनी ज्या सिद्धान्ताचा आधार घेतला आहे, तो आहे जमिनीच्या थरांच्या व भूखंडांच्या जडणघडणीविषयीचा सिद्धान्त. त्यातील गोंडवाना या शब्दाचा व आजच्या गोंड जमातीचा काहीही संबंध नाही असे त्या क्षेत्रातील विद्वानांचे मत आहे हे त्यांना माहिती नाही की त्यांनी जाणूनबुजून दुर्लक्ष केले ?

तसेच काही चिन्हे, नावे समान असणे हे एखाद्या संस्कृतीच्या व्यापकतेचा निर्विवाद पुरावा होऊ शकत नाही हे साधे शास्त्रीय तत्त्व श्री. आत्राम अमान्य करतात आणि जरा एखादा शब्द सारखा दिसला की लगेच हे आमचेच असे म्हणतात हे निव्वळ हास्यास्पद आहे. पण श्री. आत्राम आपल्या कोशातून बाहेर यायला तयार नाहीत.

माझ्या पूर्वीच्या व याही पत्राचा उद्देश हा लेखकाला नाउमेद करण्याचा किंवा 'त्याच्यापेक्षा मी

अधिक शहाणा' असे दाखवण्याचा नाही; पण त्याबरोबरच लेखकानेही आपण करीत असलेल्या प्रतिपादनाविषयी अधिक जागरूक राहावे हे लक्षात आणून देण्याचा आहे.

अंतराळवीर चंद्रावर जाऊन तेथील दगड-माती इ. वस्तू आणतात व पृथ्वीवरील शास्त्रज्ञ प्रयोगशाळेत त्यांचे पृथक्करण करतात. उद्या जर अंतराळवीर म्हणू लागला, की चंद्रावर मी गेलो होतो म्हणून मी सांगेन तेच पृथक्करण खरे आणि प्रयोगशाळेत बसणाऱ्या शास्त्रज्ञाला त्याविषयी काहीच बोलण्याचा अधिकार नाही, तर ते चूक ठरेल. त्याचप्रमाणे श्री. मेश्राम, श्री. आत्राम यांच्यासारख्यांनी तूर्त अंतराळवीराची भूमिका वठवावी.

श्री. आत्राम ज्याला 'अनुभवजन्य ज्ञान' म्हणतात, ते म्हणजे केवळ वाडवडिलांकडून त्यांच्यासारख्यांनी ऐकलेली माहिती असते. मी जर २–३ वर्षे भरपूर पैसे घेऊन त्या प्रदेशात हिंडलो तर अनेक माहितगार वृद्ध गोंड मला भरपूर माहिती सहज देतील, त्यात काही अवघड नाही हे श्री. आत्राम विसरतात. पृ. ४९, स्तंभ १, ओळ १ यात ते म्हणतात, की यातील गुह्य गोरेंना कळूच शकत नाही. ही चुकीची समजूत आहे. यापूर्वी अनेकांना ते कळलेले आहे, त्याचे विश्लेषणही झालेले आहे. फक्त श्री. आत्रामांना ते माहिती नसावे असे त्यांच्या एकूण लिहिण्यावरून वाटते. गोंडांशिवाय इतरांना गोंडांविषयी काही समजूच शकणार नाही हा संकुचित दृष्टिकोन सोडून श्री. विनायक तुमराम यांचा व्यापक दृष्टिकोन अंगिकारण्याचा प्रयत्न त्यांनी करावा (हाकारा : ऑक्टो. ८३). श्री. भाऊ मांडवकरांनी लिहिले, तसे एखादे माहितीपर पुस्तक लिहावे आणि मग माझ्यासारख्यांचे अज्ञान उघडे पाडण्याचा प्रयत्न करावा असे मित्रत्वाच्या नात्याने त्यांना मी आवाहन करतो.

माझ्या यापूर्वीच्या पत्रात मी विचारलेल्या, पण श्री. आत्रामांनी (व श्री. मेश्रामांनीही) ज्याला बगल दिली अशा प्रश्नाचे मीच आता उत्तर देतो. श्री. आत्राम व श्री. मेश्राम ज्या गोंडांविषयी बोलताहेत ते चंद्रपूर जिल्ह्यातील व परिसरातील राजगोंड, प्रधानगोंड व त्यांच्याप्रमाणेच गोत्रसंच असणाऱ्या बाकीच्या गटांतील गोंडलोक असावेत. अर्थात हा माझ्यासारख्या 'अज्ञानी' व्यक्तीने, केवळ 'पुस्तकी संदर्भावरून' केलेला अंदाज आहे. तो खरा की खोटा तेवढे कळवण्याची तसदी श्री. आत्रामांनी घेतल्यास आभारी होईन.

कदाचित काही शब्द बोचरे वाटतील तर क्षमा मागतो; परंतु श्री. मेश्रामांच्या आक्रमकतेला उत्तर देताना ते अपरिहार्य होते.

सहकार्याबद्दल धन्यवाद.

—सुधांशु गोरे

⊙ ⊙ ⊙

## साभार पोच

* **आसवांचा लळा** (कवितासंग्रह) – राजा गायंगी; प्रकाशक केशवराव चौधरी, निदेशक, आंतर भारती मुद्रणालय, ४२ आंबेकर मार्ग, वडाळा, मुंबई ४०००३१; १९८३; पृ. ७४; किं. १० रुपये.
* **अर्वाचीन मराठी** – रमेश धोंगडे; (महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ; नागपूर १० यांच्यासाठी) कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे ३०, १९८३, पृ. २३५; किं. ३० रुपये.
* **आभाळातील अभ्रे** – (ललित व वैचारिक लेख) प्रभाकर पाध्ये; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे– ३०; पृ. १२६; किं. १८ रुपये.
* **छावा** (नाटक) – शिवाजी सावंत; कॉन्टिनेन्टल प्रकाशन; विजयानगर, पुणे– ३०; १९८३; पृ. १११; किं. १० रुपये.
* **युगविधान** – बा. स. हाटे; संबोधि प्रकाशन, १७/५२६, शास्त्रीनगर, गोरेगाव (पश्चिम), मुंबई ४०० १०४; १९८३; पृ. १९४; किं. ३५ रु.

अनुक्रमणिका

## सार-संकलन

### आजचा चीन

गेले तेरा महिने चीनमध्ये एका इंग्रजी भाषिक वर्तमानपत्रात संपादकीय साहाय्यक म्हणून काम केलेल्या एका पत्रकाराचे चीनविषयीचे अनुभव असे आहेत : चिनी सरकारच्या हल्लीच्या धोरणाचा सारा भर आर्थिक प्रगती साधण्यावर आहे. १९८१ साली कम्युनिस्ट पक्षाच्या मध्यवर्ती समितीने काढलेल्या जाहीरनाम्यात असे म्हटले आहे, की 'चिनी समाजातील आजचा मुख्य व्याघात (कॉन्ट्रॅडिक्शन) म्हणजे लोकांच्या वाढत्या भौतिक आणि सांस्कृतिक गरजा आणि उत्पादनातील मागासलेपणा ह्यांच्यामध्ये असलेली दरी हा होय. साम्यवादी मंडळींना 'व्याघाता'च्या भाषेशिवाय बोलणे अशक्य असते. सरळ भाषेत ह्या विधानाचा अर्थ असा, की चिनी लोकांच्या भौतिक आणि सांस्कृतिक गरजा वाढत आहेत आणि उत्पादनव्यवस्था तशीच मागासलेली राहिली आहे; आणि ही तफावत दूर करणे आवश्यक आहे. सरकारचा अंदाज आणि उद्दिष्ट असे आहे, की इ. स. २००० च्या सुमाराला चिनी लोकसंख्या १२० कोटीच्या आसपास स्थिरावी आणि उत्पादकता आजच्या चौपटीने वाढावी.

आजचे प्रमुख चिनी नेते डेंग शियाओपिंग आणि त्यांचे सहकारी हे व्यवहारवादी (प्रॅग्मॅटिक) धोरणाचा पुरस्कार करतात, माओ झेडाँग यांच्या आदर्शवादी, स्वप्नाळू धोरणात त्यांनी मूलभूत परिवर्तन घडवून आणले आहे ही आता परिचित अशी गोष्ट आहे. माओ झेडाँग यांना नवा साम्यवादी माणूस घडवायचा होता आणि तो घडविण्याची त्यांना घाई झाली होती. स्पर्धा करणे हे प्रतिगामी आहे, बाजारभावातील चढउतारांचा फायदा उठवून नफा कमावणे हा गुन्हेगारीचा प्रकार आहे अशी त्यांची चिनी जनतेला शिकवण होती. ह्याच्या उलट डेंग म्हणतात की स्पर्धा ठीक असते, तिच्यात काही गैर नाही आणि स्पर्धेच्या मार्गाने चार पैसे गाठी करण्यातही काही अयोग्य असे नाही. एके काळी ग्रामीण भागातील 'कम्यून्स' हा चिनी साम्यवादी समाजाचा गाभा आहे असे मानण्यात येत असे. आता कम्यून्सची घट्ट बांधणी हळूहळू सैल करण्यात येत आहे. सभासदांना जमीन खंडाने देणारी आणि त्यांना शेतीसाठी आवश्यक असलेल्या सोयी उपलब्ध करून देणारी यंत्रणा एवढेच स्वरूप कम्यून्सना देण्यात येत आहे.

सरकार तरुणांना स्वतःचा काही उद्योग किंवा धंदा सुरू करायला प्रोत्साहन देत असते कारण सर्वांना देण्याएवढ्या नोकऱ्या सरकारकडे नाहीत. रस्त्यांच्या बाजूला सायकली दुरुस्त करणारी दुकाने, चहापाण्याची, चांभारांची दुकाने आता मोठ्या प्रमाणावर थाटलेली दिसत आहेत. अधिक महत्त्वाची गोष्ट ही, की चिनी उद्योगधंद्यांच्या एका मोठ्या भागाला आता बाजारात उतरून स्पर्धा करावी लागत आहे; आणि स्पर्धेत टिकून राहावे लागत आहे. ह्याचा अर्थ असा, की कामगारांना त्यांच्या उत्पादकतेच्या प्रमाणात वेतन देण्याचे तत्त्व त्यांना पाळावे लागत आहे. शिवाय चीनमध्ये आता अनेक खास औद्योगिक क्षेत्रे विकसित करण्यात आली आहेत. तेथे परकीय भांडवलाची गुंतवणूक आणि परकीय व्यवस्थापनांचा सहभाग यांच्या साहाय्याने जे उद्योगधंदे चालविण्यात येत आहेत त्यांच्यात कार्यक्षमतेवर भर देण्यात येत आहे. पूर्वी कामगारांना पूर्ण सुरक्षितता असे आणि सर्व प्रकारचा हलगर्जीपणा खपवून घेण्यात येत असे. आता तसे राहिलेले नाही.

१९६६ ते १९७६ ह्या दशकात माओ यांनी सुरू केलेली सांस्कृतिक क्रांती सर्वत्र गर्जत आणि घोंगावत होती. साम्यवादी सर्वाधिकारशाहीखाली अगोदरच भरडल्या गेलेल्या चिनी जनतेमधून जे काही विचाराचे आणि आचाराचे स्वातंत्र्य अजूनही शिल्लक राहिले असेल ते उखडून काढणे हे सांस्कृतिक क्रांतीचे उद्दिष्ट होते. कम्युनिस्ट पक्षामधील भिन्न गटांतील सुंदोपसुंदीला ऊत आला होता आणि निर्घृण दडपशाहीचे सर्वत्र थैमान सुरू होते. कम्युनिस्टपूर्व चिनी जीवनाचे सर्व अवशेष पूर्णपणे नष्ट करण्याचा चंग सांस्कृतिक क्रांतीच्या नेत्यांनी बांधला होता. प्राचीन मंदिरे आणि राजवाडे यांच्या उत्कृष्ट



अनुक्रमणिका

वास्तूंचा गिरण्या आणि कारखाने म्हणून वापर करण्यात येऊ लागला. आज सांस्कृतिक क्रांती ओसरून गेली आहे. पण अशा विटलेल्या वास्तूंच्या स्वरूपात तिचे अनेक अवशेष आज मागे उरले आहेत.

तिचे दुसऱ्या प्रकारचे अवशेष मोडलेल्या माणसांच्या रूपाने ठिकठिकाणी आढळतात. असा एखादा माणूस एखाद्या परदेशी माणसाला हळूच बाजूला नेऊन आपली कहाणी त्याच्या कानात कुजबुजतो. (यासाठी त्याला परदेशी माणसाचा आसरा घ्यावा लागतो; कारण कुणीही चिनी त्याच्याशी हितगुजाच्या गोष्टी करताना आढळणार नाही. तसे करणे धोक्याचे असते.) तो सांगेल, की त्याला बारा तुरुंगांत डांबण्यात आले होते. तुरुंगात संडास साफ करण्याचे काम त्याला देण्यात आले होते. त्याचा अपराध हा होता, की त्याने अमेरिकेत शिक्षण घेतले होते आणि समाजशास्त्रासारखा 'बूर्ज्वा' विषय तो विद्यापीठात शिकवीत होता.

सांस्कृतिक क्रांतीची अध्वर्यू असलेली 'चांडाळ-चौकडी' निकालात काढण्यात आल्यानंतर क्रांतीच्या काळात लोकांनी भोगलेल्या यातनांचा आविष्कार करणाऱ्या साहित्याला पूर आला. 'व्रण साहित्य' (स्कार-लिटरेचर) या नावाने हे साहित्य प्रसिद्ध आहे. विशिष्ट राजकीय विचारप्रणालीशी असलेल्या बांधीलकीला कितीही महत्व असले तरी स्वतःच्या माणुसकीची जोपासना करण्याला त्याहूनही अधिक महत्त्व असते, हा ह्या साहित्याचा मध्यवर्ती संदेश होता. सांस्कृतिक क्रांतीच्या भयानक अनुभवानंतर अधिक मोकळिकीचे वातावरण टिकून राहील अशी आशा निर्माण झाली होती. फ्रॉईड आणि सार्त्र यांसारख्या पाश्चात्त्य विचारवंतांचे ग्रंथ विद्यार्थी बिचकत का होईना हाती घेऊ लागले होते. पाश्चात्त्य साहित्यसमीक्षेवर फ्रॉइडच्या विचारांच्या झालेल्या परिणामांचे नेमके विश्लेषण एखादा प्राध्यापक करू लागला होता. मधून मधून येणारे महापूर, होणारे धरणीकंप, होणारे गुन्हे यांच्या बातम्या प्रसिद्ध होऊ लागल्या होत्या. माओ यांच्या काळात अशी दृढ श्रद्धा होती, की अशा घटना साम्यवादी समाजाच्या संदर्भात घडूच शकत नाहीत. आणि म्हणून त्या हट्टाने घडल्या तरी त्यांची बातमी देण्याचा प्रश्नच उद्‌भवत नव्हता.

पण आता सर्वाधिकारशाहीची मगरमिठी परत आवळली जाऊ लागली आहे. फरक एवढाच, की माओ यांची सर्वाधिकारशाही एका प्रकारच्या गूढवादावर– साम्यवादी समाजरचना परिपूर्ण आहे आणि तिची घटक असलेली व्यक्ती अंतर्बाह्य बदलून जाते असे मानणाऱ्या गूढवादावर – आधारलेली होती; तर डेंग यांची सर्वाधिकारशाही तंत्रशाहीवर आधारलेली आहे.

पण सर्वाधिकारशाहीला विचारप्रणालीची (आयडिऑलॉजी) बैठक लागतेच. आणि डेंग यांना माओवादामध्ये ही बैठक उपलब्ध आहे. यामुळे अलीकडे 'कला आणि साहित्य मंडळांचे संघ' ह्या सरकारी संस्थेने "माओ झेडाँग यांचे कला व साहित्य यांवरील विचार नाकारणाऱ्या कोणत्याही सौंदर्यशास्त्रीय उपपत्तीवर" कडक टीका करणारा ठराव प्रसिद्ध केला. "कलाकृतीची निर्मिती हा केवळ कलावंताचा आत्माविष्कार असतो" ह्या भूमिकेला विरोध करणारे निवेदन चिनी चित्रपटसंघाने प्रसिद्ध केले आणि "माणसामाणसांमधील वर्गभेद अस्पष्ट करणाऱ्या मानवी प्रकृतीविषयीच्या बूर्ज्वा उपपत्तीविरुद्ध" आपल्या सभासदांना सावध केले. अनेक सरकारी अहवालांत मार्क्सवादेतर जडवाद, ख्रिश्चन धर्म, अस्तित्ववाद, बूर्ज्वा व्यक्तिवाद, पाश्चिमात्य आध्यात्मिक रानटीपणा यांच्यामुळे तरुण पिढीच्या मानसिक आरोग्याला धोका पोचण्याची भीती व्यक्त होत असते; पण जेव्हा एका सांस्कृतिक अधिकाऱ्याने साम्यवादी समाजरचनेतही काही व्यक्तींमध्ये परभावाची (एलिअनेशन) अवस्था आढळून येणे शक्य आहे असे विचार मांडले, तेव्हा त्याची नाचक्की करून त्याला ते परत घ्यायला भाग पाडण्यात आले. तेव्हा सांस्कृतिक क्रांती ओसरली म्हणून अधिक उदार, मोकळिकीचे वातावरण निर्माण झाले आहे, असे नाही.

प्रत्येक व्यक्ती कोणत्यातरी 'वर्क–युनिट'ची (कामकरी–संघ) सदस्य असते आणि संघाच्या प्रमुखाजवळ तिच्या जीवनाचा सर्व वृत्तांत नमूद करणारे टाचण असते. तिच्या खाजगी जीवनावर तिचे ज्यांच्याशी विशेष संघटण असेल अशा सर्व स्नेहीसंबंधितांवर देखरेख करणे ही संघप्रमुखाची

अनुक्रमणिका






जबाबदारी असते. संघप्रमुखाने विचारलेली कोणतीही माहिती देण्यात खळखळ करणे हा गुन्हा आहे. ह्या परिस्थितीत प्रत्येकाला लपवाछपवीची सवय जडलेली असते. हा दुसरा स्वभाव बनलेला असतो. एक जुने चिनी वचन असे आहे. " सत्य सांगणे हे चांगले असते. पण काहीच न बोलणे हे त्याहूनही चांगले असते. " तेव्हा अधिकाऱ्याने जेवढे प्रश्न विचारले असतील त्यांची काय ती उत्तरे द्यावी, त्यापेक्षा अधिक काही बोलू नये असे प्रत्येक माणसाचे धोरण असते. स्वतःविषयी शक्य तो बोलायचेच नाही असे प्रत्येकाने ठरविलेले असते.

'बालक–प्रासादा'ला (चिल्ड्रेन पॅलेस) एकदा भेट देण्याचा प्रसंग आला. यात मुलांसाठी विज्ञान, क्रीडा, संस्कृती यांच्याविषयीचे प्रदर्शन भरविलेले आहे. यात एकटचा दुकटचा मुलाला प्रवेश मिळत नाही. किंवा केवळ पालकाबरोबर असलेल्या मुलालाही प्रवेश मिळत नाही. फक्त मुलांच्या अधिकृत गटांनाच प्रवेश मिळतो. ते असो. हा जो बाल–प्रासाद आहे ते म्हणजे पूर्वी एक खाजगी निवासस्थान होते अशा खाणाखुणा आढळतात. 'ह्या घरी कोण राहत होते ?' असे जेव्हा सोबत असलेल्या बाईला विचारण्यात आले– ही बाई तीस वर्षे पत्रकार म्हणून काम करीत होती– तेव्हा तिने सावधपणे एवढेच उत्तर दिले, " इथे कुणीतरी राहत असणार असं मला वाटतं. " पुढचा संवाद असा :

" कोण असेल ते ? "

" मला वाटतं ते मला माहीत नाही. "

" कम्युनिस्ट पक्षातील ती कुणीतरी वरिष्ठ व्यक्ती असणार असं नाही तुला वाटत ? "

" तसंच असणार बहुतेक. "

" चांडाळचौकडीतीलसुद्धा कुणीतरी असेल ती. "

" शक्य आहे. "

" हे जिआंग किंगचं घर आहे, नाही का ? " या प्रश्नावर ती बाई गप्प बसली. तिने आभाळाकडे डोळे लावले आणि टक लावून पाहू लागली. हा प्रश्न विचारण्यात आलाच नव्हता असे तिला दाखवून द्यायचे होते. जिआंग किंग ही माओ यांची पत्नी. चांडाळचौकडीची प्रमुख. ते घर तिचे होते. स्वतः थाटात, ख्यालीखुशालीत राहणारी ही बाई बहुजनसमाजाला साध्या राहणीचे महत्त्व सांगणारी प्रवचने करीत असे. तिच्या अनेक निवासस्थानांतील हे एक निवासस्थान होते हे अनेकांना माहीत होते. पण सत्य सांगण्यापासून काही लाभ होत नाही हे ज्या बहुसंख्य चिनी लोकांना ठाऊक झाले आहे, त्यांतील ही सोबतीची एक बाई होती.

लु झून हे कम्युनिस्टपूर्व चिनी राजवटी व समाज यांचे उपरोधी टीकाकार म्हणून साम्यवाद्यांमध्ये साम्यता पावलेले लेखक आहेत. त्यांनी असे म्हटले आहे, की चीनच्या इतिहासात दोन प्रकारचे कालखंड आढळून येतात. एक म्हणजे जेव्हा चिनी जनतेला आपल्याला स्थिर असे गुलामगिरीचे जीवन कधी जगायला मिळेल अशी व्यर्थ इच्छा लागून राहिलेली असते असा कालखंड. आणि दुसरा म्हणजे जेव्हा तिची ही इच्छा तृप्त होऊन ती स्थिर असे गुलामगिरीचे जीवन उपभोगत असते असा कालखंड.

जेव्हा जुलूमजबरदस्ती अधिकच तीव्र होत असे, तेव्हा चिनी जनतेत स्वातंत्र्याची आकांक्षा निर्माण होत नसे; तर सम्राटाच्या दरबारी आपल्या वतीने प्रामाणिकपणे रदबदली करणारा कुणीतरी अधिकारी असावा एवढीच तिची इच्छा असे. माओ यांच्या कारकीर्दीत झाउ एन् लाय यांचे स्थान हे होते. पण ह्यावरून चीनमध्ये लोकशाही राजवट रुजणारच नाही असा निष्कर्ष काढणे योग्य ठरणार नाही. एकोणिसाव्या शतकात जेव्हा पाश्चात्त्य विज्ञान व वाफेच्या बोटी, रेल्वे, इ. पाश्चात्त्य तंत्रज्ञानाची फळे यांचा चिनी जनतेला परिचय झाला तेव्हा त्यांच्या बरोबरच मानवी व्यक्तीचे स्वातंत्र्य, तिचे हक्क आणि लोकशाही राज्यव्यवस्था ह्या पाश्चात्त्य संकल्पनांचाही परिचय झाला. त्यांनी चिनी बुद्धिजीवी वर्गात मूळही धरले. १९२० च्या सुमारास चीनमध्ये लोकशाहीची मूल्ये, मानवतावाद आणि स्त्रियांचे हक्क यांचा पुरस्कार करणारी एक समर्थ चळवळ उभी राहिली होती. ती यशस्वी झाली नाही याचे कारण चिनी जनतेच्या स्वाभाविक मनःप्रकृतीमध्ये किंवा इतिहासाच्या पोलादी नियमांमध्ये शोधायचे कारण नाही. त्याचे कारण एवढेच, की जेव्हा साम्यवादी चीनमध्ये सत्तेवर आले तेव्हा त्यांनी आपल्याला पाठिंबा देणाऱ्या लोकशाहीवाद्यांना प्रथम आपल्यामध्ये सामावून

अनुक्रमणिका

घेतले आणि मग अलग पाडून त्यांचे राजकीय शिरकाण केले.

माओवाद्यांच्या रोमँटिक, आदर्शवादी धुंदीमध्ये सर्वाधिकारशाही काही प्रमाणात सह्य करण्याची शक्ती होती. डेंग यांच्या व्यवहारवादी सर्वाधिकारशाहीच्या ठिकाणी ती अजिबात नाही. यामुळे चीनमधील उरल्यासुरल्या लोकशाहीवाद्यांची स्थिती अधिकच बिकट झाली आहे. घोर निराशा आणि तिच्यातून निर्माण होणारा तुच्छतावाद ( सिनिसिझम) ह्यांच्या पलीकडे आजच्या चिनी राजवटीला प्रतिसाद देण्याचे त्राण त्यांच्यांत राहिलेले नाही. "ते आता आमच्या गळी साम्यवाद उतरविण्याचाही प्रयत्न करीत नाहीत. आता त्यांच्याकडे फक्त माझे–आज्ञापालन–करा–वाद काय तो उरला आहे. आपली सत्ता टिकवून धरण्यासाठी सबबी सांगण्यापलीकडे आम्हाला देण्यासारखे त्यांच्याकडे काहीच उरलेले नाही. " हे एका लोकशाहीवाद्याचे आजच्या चिनी राजवटीवरील भाष्य आहे.

सांस्कृतिक क्रांतीचा एक परिणाम म्हणून साम्यवादावरील श्रद्धा कोसळल्यामुळे जुन्या श्रद्धा परत फोफावू लागल्या आहेत. काही तरुण जोडपी आपल्या विवाहाच्या प्रसंगी आपले आयुष्य सुखाचे जावे म्हणून बुद्धाची प्रार्थना करतात अशी खंत एका बातमीमध्ये व्यक्त करण्यात आली आहे. बीजींगच्या रोमन कॅथालिक चर्चमध्ये गेल्या ख्रिस्मसच्या सणात ७००० भाविक दाटीने प्रार्थनेसाठी जमले होते.

गेल्या हजारो वर्षांच्या अनुभवाने सरकारकडून फारशी अपेक्षा बाळगण्यात अर्थ नाही हा धडा चिनी लोक शिकले आहेत. सरकारकडून होणारा अनाचार हसतमुखाने, स्वतःची प्रतिष्ठा न सोडता सहन करायची सवय त्यांनी जडवून घेतली आहे. ' इतर अनेक समाजांपेक्षा दुःख आणि यातना सहन करायची आम्हाला अधिक ताकद आहे ' असा सार्थ अभिमान बाळगणारे अनेक विचारी चिनी आढळतात. पण अबोलपणे आणि स्वाभिमानाने दुःख सहन करण्याची ही अनुपम ताकद दुसऱ्या दृष्टीने पाहता दुबळेपण ठरते. सहन करायची शक्ती ही घडविण्याची शक्ती नसते.

## एक भारतीय सत्यकथा

श्री. श्यामसुंदर मिश्र हे एक इंजिनिअर आहेत. ते लखनौ येथे उत्तरप्रदेश सरकारच्या नोकरीत होते. मार्च १९५७ मध्ये त्यांना सदोष मनुष्यवधाच्या खोट्या आरोपाखाली पकडण्यात आले, कोणत्याही न्यायालयापुढे उभे करण्यात आले नाही, त्यांना वेड लागले आहे म्हणून जाहीर करण्यात आले, वेडयांच्या इस्पितळात बंदिस्त करण्यात आले आणि तेथे होणारा छळ सहन करीत, सुटका होण्यापूर्वी २६ वर्षे ४ महिने ते इस्पितळात राहिले. त्यांनी खरोखर गुन्हा केला असता व त्यांना शिक्षा झाली असती तर तिची मुदत संपून ते खूप वर्षांपूर्वी तुरुंगातून सुटले असते. चार वर्षांपूर्वी त्यांना जामिनावर सोडावे म्हणून करण्यात आलेला अर्ज एटवा कोर्टाने फेटाळला आणि त्यांच्या एका नातेवाईकाने सर्व हकीकत केंद्र सरकारच्या गृह मंत्रालयाला कळविल्यानंतरही श्री. मिश्रा यांची सुटका व्हायला अकरा महिने लागले. त्यांना पकडले तेव्हा ते ऐन उमेदीत होते. त्यांना प्रतिष्ठित सरकारी नोकरी होती. आता ते कफल्लक आहेत. त्यांची प्रकृती खंगली आहे आणि त्यांचे वय झाले आहे. आपल्याला भरपाई मिळावी म्हणून त्यांनी केलेला अर्ज उ. प्र. सरकारने फेटाळून लावला आहे व श्री. मिश्र यांनी आता वरिष्ठ न्यायालयाकडे दाद मागितली आहे.

अनुक्रमणिका

Registered No. SAT - 29 and Licenced to post without pre-payment--Licence No. 6

*With Best Compliments From*

# The All India Federation of Co-operative Spinning Mills Ltd.



**Mr. V. G. PURANIK**
Managing Director

**Mr. D. R. PATIL**
President

हे मासिक श्री. म. दीक्षित यांनी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून
म. तु. [illegible] यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.